नेहरू बाल पुस्तकालय

# अमर ज्योती

गोपीनाथ तळवलकर

चित्रकार
जोमराज



नॅशनल बुक ट्रस्ट, इंडिया

# नानक

पंजाबातील अेका खेडेगावातील धर्मशाळा. रात्र झालेली. आकाशात चांदण्या लुकलुकत आहेत. अेखादी वाऱ्याची झुळुक अुष्मा थोडा कमी करीत आहे. अशा वेळी गुरूशिष्याची अेक जोडी त्या धर्मशाळेमध्ये आरामात सुखसंवाद करीत होती. गुरू भव्य, तेजस्वी होते. त्यांच्या मुद्रेभोवती प्रकाशाचे वलय आहे असे वाटे. लाखात उठून दिसेल असा रुबाब होता त्यांचा. शिष्यही मोठा भक्कम बांध्याचा आणि शांत चेहऱ्याचा होता.



आपल्या गुरूबद्दलची भक्ती त्याच्या डोळ्यांतून ओसंडत होती. गुरूचे पाय चेपीत तो दिवसभर केलेल्या पदयात्रेची हकीकत सांगत होता.

"गुरुजी, आज गावात आपणाला चांगला अनुभव आला, नाही? ज्या दारी जावं तिथं प्रेमानं माणसं स्वागत करायची. बसायला आसन देऊन काही सेवा करू का विचारायची. एका घरातून दुरुत्तर आलं असेल तर शपथ. कुणी दूध दिलं, कुणी आटा दिला, कुणी कपडे घेता का म्हणून नम्रतेनं विचारलं. छे:! इतकं उत्तम, आतिथ्यशील, सुसंस्कृत गाव आपण पाहिलं नाही."

गुरू दाढीवरून हात फिरवीत शांतपणे म्हणाले, "बेटा मर्दाना, हे



गाव परमेश्वर नष्ट करो."

"म्हणता काय गुरुजी? इतक्या सालस लोकांना असा शाप?" मर्दाना पाय चेपता चेपता चकित होऊन थांबला. काहीशा तक्रारीच्या सुरात तो बोलू लागला,

"महाराज, आपले विचार आणि मार्ग आम्हा सामान्य माणसांना अगम्य आहेत. मागल्या गावी माणसं आपला उपहास करीत होती. पण ते गाव सोडताना आपण म्हणाला, हे गाव परमेश्वर सुरक्षित ठेवो."

गुरुजी शांतपणे हसून म्हणाले, "असं पहा, वाईट लोकांनी भरलेलं गाव शाबूत राहण्यातच जगाचं कल्याण नाही का? गाव तिथंच असलं म्हणजे वाईट बाहेर जगात जाणार नाही, चिघळणार नाही. पण चांगल्या लोकांचं हे गाव जर नष्ट झालं तर इथले लोक जगात पसरतील. अनेक ठिकाणी चांगुलपणा, प्रेम घेऊन जातील."

मर्दानाचे समाधान झाले. आपल्या गुरूची मनुष्याच्या कल्याणाविषयीची उदार बुद्धी त्याला पुनः एकदा कळून आली. हे थोर गुरू म्हणजे शीख धर्माचे संस्थापक नानकसाहेब होत. त्यांचा शिष्य मर्दाना याने त्यांची जन्मभर सोबत



केली. तो मरेपर्यंत अहोरात्र छायेप्रमाणे त्यांच्याबरोबर होता.

पजाबमध्ये पंधराव्या शतकात मोठी विचित्र अवस्था होती. भारत हा संपन्न आणि सुपीक देश आहे अशी वार्ता सर्व जगात पसरली होती. खैबर खिडीतून कुणीही खाली उतरावे आणि लूटमार करून पैसा, धान्य, स्त्रिया, गुलाम बलात्काराने घेऊन जावे असे चाले. परकीयांच्या आघातांनी प्रस्थापित धर्म खिळखिळा होऊन गेला होता. अशा वेळी गुरू नानक यांचा अवतार झाला आणि धर्माची प्रतिष्ठा करून त्यांनी पंजाबचे जीवन समृद्ध केले. भारतावर कायम ठसा रहावा अशा तऱ्हेचा अेक समर्थ धर्मपंथ त्यांनी स्थापन केला.

नानक पंजाबातील तळवंडी ह्या गावी, 15 एप्रिल 1469 ह्या दिवशी जन्मले. ह्यांचे वडील काळू मेहता आणि आई तृप्ता हे मोठ आदर्श जोडपे होते. नानकांचे जन्मस्थान भारताच्या राजधानीपासून खूप दूर होते. शहरी जीवनाची धावपळ आणि गर्दी तेथे नव्हती. भोवताली रम्य वनश्री होती. निसर्गाने ह्या भागावर खास कृपा केली होती. ह्या भागाचा सुभेदार हा रायबुलार नावाचा एक धर्मांतरित मुसलमान होता. पण तो दयाळू आणि सहिष्णू असल्याने त्या भागातील हिंदू प्रजेला फारसा त्रास होत नसे. काळू मेहता हे रायबुलारचे पदरी एक अधिकारी होते. बालपणापासूनच भविष्यज्ञात्या लोकांनी हा मुलगा (नानक) कोणी अलौकिक मुलगा होणार आहे असे भविष्य वर्तविले होते आणि ब्रह्मज्ञान हे तर ह्या मुलाला लहानपणापासून झाले होते असे म्हणावयास हरकत नाही.

क्षत्रिय धर्माप्रमाणे लहानपणी नानकसाहेबांचे मौंजीबंधन करायचे ठरले आणि त्यांच्याकरिता यज्ञोपवीत तयार झाले. पण पुरोहिताशी छोटे नानकसाहेब वाद करू लागले, "हा दोरा तुम्ही माझ्या गळ्यात का अडकवीत आहात ? त्या दोऱ्यात सामर्थ्य असतं तर परवा जी टोळधाड आली तिच्यापासून तुम्ही आपलं संरक्षण करू शकला असता. नीती हा कापूस, संतोष हा त्याचा धागा, चित्तशुद्धी ह्या त्याच्या गाठी आणि सत्य हे त्याचं वळण - असलं जानवं तुम्ही गळ्यात घातलंत तर ते कधीही जीर्ण होणार नाही किंवा तुटणार नाही. मला तुमचं ते बाजारात मिळणारं चार दिडक्यांचं जानवं नको." हे जळजळीत उद्गार ऐकून सर्व माणसे स्तिमित झाली, आणि सर्वांनी मनोमन मान्य केले की, हे दिव्य बालक म्हणते आहे

नानकांना पाठशाळेत घालण्यात आले. त्याचप्रमाणे एका मौलवीकडेही खास दरबारी विद्या शिकण्यासाठी पाठविण्यात आले. पण नानक आपल्या गुरूंच्यापुढे शेकडो योजने असत. गुरूच ह्या शिष्याच्या पायावर डोके टेवीत. नानकांचे खरे विद्यालय म्हणजे निसर्ग हे होते. रानामध्ये एकांतात जाऊन, ते ध्यानमग्न होऊन बसत. पुष्कळदा वृक्षवेलींशी सुखसंवाद करीत. चराचरात भरून राहिलेल्या विधात्याशी आपल्या अंतःकरणाचा सूर जुळवीत, गाऊ नाचू लागत. ही त्यांची तल्लीनता पाहणारे चकित होऊन जात. त्यांना रानात गुरे राखण्याचे काम देण्यात आले. ते तर त्यांच्या अगदी पथ्यावरच पडले. पण पुष्कळदा खुशाल गुरे चरावयास सोडून ते परमेश्वराच्या चिंतनात मग्न होऊन बसत.

एकदा असेच ते ध्यानमग्न असता गुरे एका शेतात घुसली आणि त्यांनी तेथील पिकांचा फन्ना उडविला. शेताच्या मालकाच्या हे लक्षात आले. तो तणतणत आला. पाहतो तो गुरे राखणारे नानकसाहेब डोळे मिटून स्वस्थ बसले आहेत. त्याने नानकसाहेबांना रायबुलारपुढे नेले. बापाला हे कळले तेव्हा तोही संतापला. पोराला खुशाल हवी ती शिक्षा करा असे त्याने वैतागाने रायबुलारला सांगितले.

पण रायबुलार भला माणूस होता. नानक हा कुणी सामान्य गुराखी नाही हे त्याला मनोमन पटले होते. त्याने शेताची नासधूस किती झाली आहे हे पाहण्याचा हुकूम सोडला. शिपायांनी तो तात्काळ अंमलात आणला. पाहतात तो काय, नेहमीपेक्षा खूपच अधिक धान्य शेतात निघाले. नानकसाहेबांची अलौकिकता पुनः एकदा लोकांना पटली.

पुढे नानकसाहेबांना सुलतानपूर येथे बहीण व मेव्हण्याकडे पाठविण्यात आले. त्यांनी नानकसाहेबांना मोदीखान्यावर अधिकारी नेमले. हे काम त्यांच्या आवडीचेच होते. गरजू लोकांना धान्य वाटप करणे असे या कामाचे स्वरूप होते. नानकसाहेब उदार हस्ताने दान देत. कोठारात कधी तूट आली नाही. आपल्या कर्तव्यात ते कधीही कसूर करीत नसत.

यथाकाल त्यांचे लग्न झाले. पुढे त्यांना दोन मुलगेही झाले. प्रपंच साधून परमार्थाचा लाभ कसा करावा हे त्यांनी आपल्या उदाहरणावरून जगाला शिकविले.

पण नानकसाहेबांच्या अंतर्यामी मात्र स्वस्थता नव्हती. केवळ पैसा

मिळावा, सुखासमाधानाने राहावे, आणि सर्व उपभोग भोगावे एवढ्याच-करिता आपण जन्माला आलेलो नाही ही जाणीव त्यांना स्वस्थ बसू देत नव्हती. त्यांना प्रपंचातून बाहेर येऊन लोकसेवा करावयाची होती.

एक दिवस ते स्नानाला नदीत उतरले आणि अदृश्य झाले. नानक-साहेब बुडाले असा जिकडे तिकडे हाहाकार उडाला. त्यांच्या प्रेताचा शोध सुरू झाला. परंतु खूप शोध करूनही ते सापडले नाहीत. नानकसाहेबांनी इहलोकीची यात्रा संपविली, असाच सर्वांचा ग्रह झाला. अखेर तिसऱ्या दिवशी ते अचानकपणे पाण्यातून वर आले.

असे सांगतात की ह्या तीन दिवसात परमेश्वराचे सान्निध्य त्यांना लाभले होते. प्राणिमात्र कसल्यातरी वेदनेने संतप्त आहेत आणि शीड नसलेल्या बोटीप्रमाणे मानव जात कोणीकडे तरी चाललेली आहे, हे सर्व पाहून मानवी समाजाच्या उद्धारासाठी आपले जीवित समर्पण करण्याचा त्यांचा निश्चय झाला. आपला पट्टशिष्य मर्दाना ह्याला घेऊन खरोखरच भूतलावर संचार करण्यासाठी ते निघाले.

एकदा एका काजीने नानकसाहेबांना जबरदस्तीने प्रार्थनेला नेले. नबाबही प्रार्थनेला आला होता. नानकसाहेब त्या प्रार्थना करणाऱ्या भक्त-गणापासून दूर एकटेच उभे होते. नमाज संपल्यानंतर काजीने नबाबाला म्हटले, " हा नास्तिक मनुष्य प्रार्थनेच्या वेळी बाजूला स्वस्थ उभा होता. ह्याने ईश्वराविरुद्ध गुन्हा केला आहे. ह्याला शिक्षा द्यावी. " त्यावर नानकसाहेब हसून म्हणाले, " काजीसाहेब, तुम्ही फक्त डोळे मिटून प्रार्थना करण्याचा देखावा करीत होता इतकंच. तोंडानं कुराणातील मंत्र म्हणत होता पण तुमच्या मनात विचार मात्र भलतेच चालले होते. घरी नुकत्याच जन्मलेल्या शिंगराची काळजी तुम्हाला वाटत होती. त्या शिंगराला अपघात होईल की काय ह्या भीतीनं तुमच्या मनाची गाळण उडाली होती. हे नबाबसाहेब डोळे मिटून प्रार्थना ऐकत होते. याचं मन तरी कुठं प्रार्थनेत होतं ? काबूलला घोडे खरेदी करण्याकरिता माणसं पाठविली आहेत, ती आली की नाही ह्या चिंतेत नबाबसाहेब होते. अशा तऱ्हेची एकाग्रता सोडून केलेली प्रार्थना मला मंजूर नाही. " आपले अंतरंग ह्या अवलियाने जाणले हे पाहून दोघे चकित झाले. काजी तर नानकसाहेबांच्या बरोबर पदयात्रा करण्यास सिद्ध झाले.

नानकसाहेब ज्या ज्या ठिकाणी जात त्या त्या ठिकाणी दलित,



उपेक्षित ह्यांच्यामध्यं मिसळत. त्यांची विचारपूस करीत. त्यांना धीर देत. मार्ग दाखवत. त्यामुळे दलित वर्गाचा उद्धारकर्ता म्हणून त्यांची कीर्ती सर्वत्र पसरली. असेच एके ठिकाणी ते गेले असता, भाई लालो ह्या नावाचा एक गरीब शुद्र कामकरी त्यांना सामोरा आला. आपल्या झोपडीत येऊन त्यांनी भोजन करावे अशी त्याने विनंती केली. आपल्या गरीबीच्या संसारात मिळाले ते वापरून त्याने नानकसाहेबांचे पान सजविले. नानकसाहेब म्हणाले, "बेटा, इतकं रुचकर अन्न मी माझ्या जन्मात खाल्लं नाही," आणि त्यांनी मिटक्या मारीत ती भाकरी खाल्ली. त्याचवेळी गावचा पाटील अमीर भागो ह्याने नानकसाहेबांना जेवणाचे निमंत्रण पाठवले. पण मी ह्या ठिकाणीच सुग्रास अन्न खाऊन संतुष्ट झालो आहे असा नानकसाहेबांनी त्याला निरोप पाठवला. खवळलेला भागो त्या ठिकाणी आला. आपल्या निमंत्रणाचा उपमर्द केल्याबद्दल तो नानकसाहेबांना अद्वातद्वा बोल लागला.



तेव्हा ते म्हणाले, " अमीरसाहेब ह्या गरीब माणसाच्या भाकरीत दूध आहे. कारण ती त्याने स्वकष्टाने मिळविली आहे. तुम्ही लोकांची पिळवणूक करुन संपत्ती मिळवलीत, म्हणून तुमच्या भाकरीत रक्त आहे."
"हे कसे काय," असा अमीरने प्रश्न विचारताच नानकसाहेबांनी अमीरची भाकरी एका हाताने चुरगळली तो त्यातून खरोखरच रक्ताचे थेंब पडले. दुसऱ्या हाताने लालोची भाकरी ते कुस्करू लागले तेव्हा तीमधून दूध बाहेर पडले. अमीर भागो निरुत्तर झाला आणि लोकांनी नानकसाहेबांचा जयजयकार केला.

नानकसाहेबांच्या पदयात्रेत ते एकदा हरिद्वारला गेले. त्या ठिकाणी लोक पितरांना तर्पण करीत होते. नानकसाहेब गंगेतील पाणी घेऊन

पंजाबच्या दिशेने टाकू लागले. तेव्हा हा वेडा पीर काय करीत आहे हे लोकांना कळेना. एका पंडिताने नानकसाहेबांना प्रश्न केला, " बाबा, तू हे काय करीत आहेस ? " तेव्हा नानकसाहेब म्हणाले, " पंजाबात माझी शेतजमीन आहे. ती शिपण्याकरिता मी पाणी टाकत आहे. " सर्व लोक हसू लागले. तेव्हा नानकसाहेब म्हणाले, " स्वर्गात असणाऱ्या पितरांना जर तुम्ही इथून दिलेलं पाणी पोहोचू शकतं तर मी शिंपडलेलं पाणी पंजाबातील माझ्या शेतांना का नाही पोहोचू शकणार ? पंजाब तर ह्या ठिकाणाहून फारच जवळ आहे. " ह्यावर कोण काय बोलणार ? अशा रीतीने वेडगळ धर्मसमजुतींना शह देऊन लोकांना खरा धर्म आणि नीती नानकसाहेब पटवून देत.

त्यावेळी पंजाबमध्ये सज्जन नावाचा एक कुप्रसिद्ध दरोडेखोर होता. तो जितका क्रूर होता तितकाच वस्तादही होता. हिंदूंसाठी त्याने कित्येक मंदिरे बांधली होती तर मुसलमानांसाठी मशिदी उभारल्या होत्या. त्याला वाटे, ' असे केल्याने हिंदू व मुसलमान दोघांचाही माझ्यावर विश्वास बसेल आणि ते माझ्या घरी येतील. रात्री ते सर्वजण निर्धास्तपणे झोपले की त्यांना मारून त्यांची मालमत्ता मला सहज लुबाडता येईल. '

नानकसाहेब एकदा तिकडून जात होते. सज्जनने त्यांना आपल्या घरी बोलावले. तऱ्हेतऱ्हेची पक्वान्ने त्यांच्यासमोर ठेवून त्यांचे आदरतिथ्य केले. पण हे सगळे वरवरचे. मनातून मात्र तो विचार करीत होता, ' हा माणूस इतका सुखी दिसतोय, नक्कीच ह्याच्यापाशी खूप माया असली पाहिजे. आज रात्रीच याला मारून याची संपत्ती लुटली पाहिजे. कुणाला काही कळायचं देखील नाही. '

जेवण झाल्यावर सज्जनने नानकसाहेबांना विश्रांती घ्यायची विनंती केली. नानकसाहेब सूचकपणे एवढंच म्हणाले, " बहिरी ससाणे पवित्र स्थानी-देखील असतात व ते शिकार करीत राहतात. "

नानकसाहेबांच्या बोलण्यातला गर्भितार्थ सज्जनच्या लक्षात आला. नानकसाहेबांनी आपला हेतू ओळखल्याचे त्याला उमजले. त्याच्या मनात आले. ' मी बहिरी ससाण्यासारखाच आहे. मी लोकांची पारध करतो. नानक माझ्याविषयीच बोलत असले पाहिजेत. '

त्याने नानकसाहेबांच्या पायांवर लोळण घेतली. त्यांची क्षमा मागितली.

नानकसाहेबांनी म्हटले, " सज्जन, माझी कसली क्षमा मागतो आहेस रे ? देवाची क्षमा माग. तोच तुला क्षमा करील. पण देवदेखील आपली पापं कबूल करून प्रायश्चित्त घेणाऱ्यांनाच क्षमा करतो. माझ्यापासून काही लपवू नकोस. खरं सांग. आजवर तू किती लोकांना लुबाडलंस ? किती लोकांचे प्राण घेतलेस ? "

सज्जनने लाजेने खाली मान घातली. " आजवर मी किती स्त्री, पुरुष, बालकांना लुबाडलं व मारलं त्याची गणतीच नाही. देव कसा मला क्षमा करील ? "

" तुझ्यापाशी असलेला सर्व पैसाअडका तू गोरगरीबांना दान करून टाक. " नानकसाहेबांनी त्याला सांगितले.

सज्जनने तसेच केले. आपले सर्वस्व गरीबांना दान करून तो नानकसाहेबांचा शिष्य बनला. नानकसाहेबांनी त्याचे आयुष्यच बदलून टाकले. हिंदुस्तानातले शिखांचे पहिले धर्ममंदिर सज्जन दरोडेखोरानेच बांधले. नानकसाहेबांविषयी वाटणारी आपली कृतज्ञता त्याने अशाप्रकारे व्यक्त केली.

नानकसाहेबांनी जातिभेदाच्या उच्चनीच कल्पनांवर फार प्रचंड आघात केला, आणि आपल्या मानवधर्माच्या झेंड्याखाली अगणित माणसे गोळा केली. रूढ अशा संकुचित धर्मकल्पनांचा ते नेहमी उपहास करीत



गुरू नानकांनी जो धर्म सांगितला त्याची तीन सूत्रे आहेत. कर्तव्यकर्म, प्रार्थना आणि गौरव. आपल्या बांधवांना त्यांनी परमेश्वराविषयीचे आपले कर्तव्य जसे पटवून दिले तसेच स्वत:चे शरीर आणि आत्मा ह्या संबंधीचेही कर्तव्य सांगितले. शिख म्हणजे शिष्य. ह्या शिष्याला पाच ककार घ्यावे लागतात. केस, कंगवा, कडे, कच्छ आणि कृपाण. स्वावलंबन, सामुदायिक जीवन, आणि ईश्वरप्रसाद यावर शीख संप्रदायाचा मुख्यत: जोर असतो. " वाह गुरू की फतेह " असा गुरूचा जयजयकार शीख लोक करतात.

अखेर नानकसाहेबांच्या जीवन यात्रेचे अखेरचे दिवस आले. 1531 मध्ये ते करतारपूरला आले. अश्विन महिना होता. नानकसाहेबांनी अंगदांना आपल्या समोरच गुरूपदाची दीक्षा दिली. योग्य समय येताच– म्हणजे विजयादशमीच्या मंगलदिवशी अत्यंत शांत चित्ताने नानकसाहेबांनी स्वर्ग-लोकी प्रयाण केले. ही गोष्ट सन 1539 साली घडली.

" धन्य त्यांचे जीवन ! "



# बसवेश्वर

बाराव्या शतकात कर्नाटक प्रांतातील विजापूर जिल्ह्यात बागेवाडी नावाचे एक गाव होते. तेथे मदिराजा नावाचा एक ब्राह्मण रहात असे. बहुतेक सर्व गावी असते तशीच त्या गावीही अनेक जातीच्या लोकांची वस्ती होती. शिवाय भरीला नुसती ब्राह्मणांचीच पाचशे घरे होती. अग्रहार गाव होते ते. म्हणजे राजाने ब्राह्मणांना दान दिलेले गाव. म्हणून गावावर ब्राह्मणांचे वर्चस्व होते. मदिराजा मोठा उमदा माणूस होता. गावात त्याला खूप मान होता. त्याच्या बायकोचे नाव होते मदाम्बे. हे ब्राह्मण जोडपे अतिशय धार्मिक व दयाळू होते. मात्र इतकी धनदौलत असूनही दोघे पतिपत्नी मनातून दु:खीकष्टीच असायचे. कारण त्यांना मूलबाळ नव्हते.

ब्राह्मण दंपतीने खूप देवधर्म केला. पुत्रप्राप्तीसाठी कुणी त्यांना वृषभ व्रत (शिवाचे वाहन नंदीची पूजा) करायला सांगितले. मदाम्बेने अतिशय श्रद्धापूर्वक ते व्रत केले आणि मनातल्या मनात ठरवून टाकले की जर मुलगा झाला तर त्याचे नाव बासव ठेवायचे. (कानडी भाषेत बैलाला बासव म्हणतात.)

व्रताचे फळ मिळाले. त्यांच्या घरी एका सुंदर व तेजस्वी मुलाने जन्म घेतला. मुलाच्या चेहेऱ्यावर अद्‌भुत तेज होते.

बासव अतिशय कुशाग्र बुद्धीचा होता. आईवडिलांचा तर तो लाडका होताच पण अवघ्या गावाचाही आवडता होता. त्याने खूप शिकावे, विद्वान व्हावे अशी वडिलांची इच्छा होती. त्यांनी त्याच्या शिक्षणाची उत्कृष्ट

सोय केली. बासव इतका हुशार होता की लवकरच त्याला वेदाच्या असंख्य ऋचा तोंडपाठ झाल्या.

लहानपणापासूनच एक गोष्ट बासवच्या लक्षात आली की लोकांच्या आचार व विचारात फार मोठी तफावत आहे. आणि त्याला नेमक्या याच गोष्टीचा तिटकारा वाटे. उदाहरणार्थ, लोक नागाची पूजा करायचे, पण घरात साप निघाला तर त्याला मारून टाकायचे. अग्नीची पूजा करायचे, पण आग लागली तर मात्र ती विझविण्यासाठी जिवाचा आटा-पिटा करायचे. तो पशुबळी घ्यायच्या प्रथेविरुद्ध होता. बळी दिल्या जाणाऱ्या मेंढराचा आर्तनाद व तडफड त्याला सहन होत नसे. या सर्व गोष्टींचा त्याच्या मनावर खोल परिणाम झाला आणि त्याच्या मनात असंख्य विचार येऊ लागले.

बासव आठ वर्षांचा असताना एके दिवशी त्याला गावात खूप गड-बड दिसली. ठिकठिकाणी गुढ्या तोरणे उभारली जात होती. नागर स्त्रिया घरापुढील अंगणात रांगोळ्या घालीत होत्या. मंगलवाद्ये वाजत

होती. मौल्यवान पोशाख करून मंडळी जा ये करीत होती. बासवने वडिलांना या सर्व गडबडीचे कारण विचारले. त्यांनी हसून उत्तर दिले, "अरे, आज तुझी मुंज व्हायची आहे आणि तुला याचा पत्ताच नाही म्हणजे काय ?" बासवने विचारले, "बाबा मुंज म्हणजे काय हो ?" वडिलांनी सांगितले, "ब्राह्मण व क्षत्रियांची मुले विद्योपार्जनासाठी योग्य झाली की त्यांच्या गळ्यात यज्ञोपवीत घालतात. त्या विधीला मुंज म्हणतात."

बासवने पुन्हा शंका व्यक्त केली, "पण मग ते फक्त ब्राह्मण व क्षत्रियांच्याच गळ्यात का घालतात ? इतरांच्या का नाही ?" वडिलांनी म्हटले, "खालच्या जातीच्या लोकांच्या गळ्यात घालत नाही म्हणून सांगितलं ना ? चल बघू आता." बासव म्हणाला, "पण मी तर जन्मा-



पासून ब्राह्मण आहेच. तर मग हीच गोष्ट सिद्ध करण्यासाठी यज्ञोपवीताची काय गरज ?"

वडिलांनी बासवला परोपरीने समजावले. पण बासवने मुंजीला साफ नकार दिला. म्हणाला, " मुंजीमुळे जातिभेद वाढतो. मी मुंज करून घेणार नाही. तुम्ही बळजबरी करू लागलात तर मी घर सोडून निघून जाईन. " एका लहानशा मुलाच्या तोंडून हे बोलणे ऐकून लोक थक्क झाले.

मदिराजा विचारात पडले. बासवची मुंज करायचीच असा त्यांनीही हट्ट धरला. कारण हा संस्काराचा प्रश्न नव्हता तर त्यांच्या घराण्याच्या प्रतिष्ठेचाही प्रश्न होता. त्यांनी गावातल्या अन्य ब्राह्मणांकरवी बासवला समजावले. मदाम्बेनेदेखील बासवची खूप मनधरणी केली. अखेर बासव मुंजीला तयार झाला. मोठ्या अनिच्छेने त्याने आपली मुंज करून घेतली. त्यानंतर गुरूपाशी बासवचे अध्ययन सुरू झाले. आणि मदिराजा व मदाम्बेच्या जिवात जीव आला.

वेद, व्याकरण, छंदशास्त्र, संगीत, साहित्य, दर्शनशास्त्र वगैरे विषय बासव शिकू लागला. त्याची बुद्धी तल्लख होतीच. जे काही शिकवावे त्यात तो लगेच पारंगत होई. पण एका गोष्टीची मात्र त्याला विलक्षण चीड होती. ती म्हणजे विद्यार्थ्यांना काही समजो वा न समजो त्याला सारे विषय पोपटासारखे पाठ करायला लावीत. अध्ययनाची ही पद्धत बासवला अजिबात पसंत नव्हती.

जसजसा बासव मोठा होत गेला, सामाजिक अन्यायाकडे, जातिभेदाकडे त्याचे लक्ष वेधत गेले. मुंजीच्या वेळी त्याचे ब्राह्मणांशी जे मतभेद झाले होते ते पुढे वाढतच गेले. सर्व गोष्टी उघड्या डोळ्यांनी पाहून सहन करणे बासवला दिवसेंदिवस जड जाऊ लागले.

याच सुमारास त्याचे आईवडील मरण पावले. त्यानंतर तर गावकरी त्याच्या अगदी विरुद्ध झाले. म्हणून मग बासवने गाव सोडायचे ठरवले. गाव सोडून तो कुडल संगमेश्वर नावाच्या तीर्थस्थानी निघून गेला. हे स्थान मलप्रभा व कृष्णा या दोन नद्यांच्या संगमावर वसले असून विजापूर जिल्ह्यातच आहे. संगमावर एक देऊळ आहे. संगमेश्वराचे देऊळ म्हणून ते प्रसिद्ध आहे. बासवाची इष्ट देवता म्हणून ह्या कुडल संगमेश्वराचा नेहमी उल्लेख येतो. बासव बराच काळ तेथे राहिला.

पण पुढे मोठा झाल्यावर बासवला दिसून आले की संगमेश्वर सारख्या पवित्र स्थानी असलेला समाजदेखील भ्रष्टच आहे. येथील लोक-देखील बागेवाडीच्या लोकांसारखेच आहेत. त्याच प्रकारचे सामाजिक अन्याय व जातिभेद वगैरे येथेही आहेत. तरीदेखील बासवला एक गोष्ट मनातून सतत जाणवत होती. ती म्हणजे याच स्थानी आपल्याला आध्यात्मिक ज्ञान प्राप्त होईल.

बाहेरच्या विशाल विश्वाला आपले कार्यक्षेत्र ठरवून मानव जातीच्या कल्याणार्थ कार्य करण्यासाठी बासवचे अंतःकरण त्यास आतून प्रेरित करीत होते. पण आपल्या विचारांचा व आदर्शांचा प्रचार करावयाचा तर त्यासाठी



सपत्नी व निष्ठावान उत्साही लोक हवेत. म्हणून मग बासवने नोकरी करून पैसे मिळवण्याचे ठरवले.

बासव गणितात हुशार होताच बिज्जल राजाच्या कोषागारातच नोकरी करायला काय हरकत आहे असा विचार करून तो राजाच्या कोषागारात गेला आणि मुख्य अधिकाऱ्याची वाट पहात तेथे बसला. थोड्याच वेळात खजिन्याचे मुख्य अधिकारी सिद्धदंडनाथ तेथे आले आणि हिशोब तपासू लागले. बासव जवळच उभा राहून त्यांचे वहीखाते नीट लक्षपूर्वक पहात होता. बघता बघता सहज एक चूक त्याच्या लक्षात आली. त्या चुकीमुळे फार मोठे नुकसान होणार होते. बासवने ती चूक मुख्य अधिकाऱ्यांच्या लक्षात आणून देताच त्यांना विलक्षण आनंद झाला. ते लगेच बासवाला घेऊन बिज्जल राजापाशी गेले आणि राजाला सांगितले की, "कोषागारात काम करण्यासाठी याच्या इतका हुशार माणूस दुसरा मिळायचा नाही." झाले. बासवला नोकरी मिळाली. सिद्धदंडनाथ व बासवचे आपसात नाते असल्याचे म्हणतात. बासवने त्यांच्या गंगा व माया या दोन्ही मुलींशी विवाह केला.

बासव स्वत: शैव पंथाचे होते. पण अन्य धर्मानुयायी लोकांनाही ते मान देत. सिद्धदंडनाथ यांच्यानंतर कोषागाराच्या मुख्य अधिकाऱ्याचे पद बासवना मिळाले. ते काम करीत असतानाच ते धर्मकार्यही करीत असत. बिज्जल राजाचा त्यांच्यावर पूर्ण विश्वास



होता. ते बासवच्या धार्मिक कार्यात कधीही हस्तक्षेप करीत नसत. कोषागाराच्या अधिकाऱ्याचे पद स्वीकारण्यापूर्वीच बासवनी राजाला सांगून टाकले होते की, " महाराज, मी शिवभक्त आहे. देशातून अनेक शिवभक्त माझ्याकडे येतील. त्यांचे मी यथाशक्ती आदरातिथ्य करणार. अर्थात मत्सरी माणसं आपल्या कानाशी लागून म्हणतील की हा आपल्या अनुयायांसाठी खजिन्याचा पैसा उधळीत आहे आणि आपले मन माझ्याविरुद्ध कलुषित होईल. तेव्हा हे सर्व विचारात घेऊनच तुम्ही मला हे पद द्यायचे की नाही ते ठरवावे. " राजाने त्यांना आश्वासन दिले होते की, " तुझ्यावर माझा पूर्ण विश्वास आहे. आणि माझ्यावर कुणाच्या बोलण्याचा काही परिणाम होणार नाही. "

आपल्या स्वतःच्या मिळकतीतून बासव आपल्या वीरशैव मताच्या अनुयायांचे पोषण करीत. त्यांच्या अनुयायांनी त्यांचे घर सदैव गजबजलेले असे. या संधीचा फायदा घेऊन त्यांच्या विरोधकांनी हाकाटी करायला सुरुवात केली की बासव खजिन्यातील संपत्तीचा आपल्या मताच्या प्रचारार्थ दुरुपयोग करीत आहेत. खऱ्याखोटयाची शहानिशा करून घेण्यासाठी राजाने खजिन्याची तपासणी करायला लावली. तेव्हा खजिन्यात असायला हवी त्यापेक्षा जास्तच रक्कम असल्याचे आढळले.

बासवांचा उपदेश लोकांना पटू लागला. त्यांच्या अनुयायांची संख्या दिवसेंदिवस वाढू लागली. त्यांच्या संप्रदायात सामील होण्यासाठी जातीची अट नव्हती. सर्वांना मुक्त प्रवेश होता. या बाबतीत एक गोष्ट सांगतात.

बासवांच्या भक्तांमध्ये एक ब्राह्मण व एक अस्पृश्य दोघेजण होते. त्यांना आपल्या मुलामुलीचे लग्न लावायचे होते. दोघेही वीरशैव मताचे अनुयायी व एकाच विचारसरणीचे असल्याने बासवांनी आनंदाने त्यांच्या लग्नाला संमती दिली, व त्यांना आशीर्वाद दिला. पण त्यामुळे लोक बिथरले. एका ब्राह्मण मुलाचा एका हरिजन मुलीशी विवाह व्हावा हे त्यांना सहन झाले नाही. त्यांनी राजापाशी तक्रार केली. राजाने विवाह स्थगित करण्याचा हुकूम सोडला. पण राजाज्ञेचे उल्लंघन करून विवाह साजरा झाला. त्यामुळे राजा भडकला. रागाच्या भरात त्याने त्या दोघांचे डोळे काढविले.

बासवांच्या धर्म संप्रदायाची लोकप्रियता हळूहळू वाढत होती. त्यांच्या घरी धर्मप्रवचने होत. धार्मिक प्रश्नांवर विचार विनिमय, चर्चा होत. प्रचंड

संख्येने स्त्रीपुरुष त्यांचे अनुयायी होऊ लागले होते पण त्यांची लोकप्रियता व त्यांचा प्रभाव त्यांच्या विरोधकांना पाहवला नाही. त्यांनी बासवांविरुद्ध राजापाशी अनेक तक्रारी केल्या. तोवर बिज्जल राजा व बासव यांचे संबंधही पूर्वीसारखे सलोख्याचे राहिले नव्हते. म्हणून मग बासवांनी बिज्जलची नोकरी सोडून कुडल संगमेश्वराला जाऊन आपल्या धर्माचा प्रचार करायचे ठरवले.

1167-68 साली कुडल संगमेश्वरलाच बासवांनी समाधी घेतली.

बसवेश्वरांनी वीरशैव मताचा प्रचार करता करताच स्त्रियांच्या परिस्थितीत सुधारणा घडवून आणण्यासाठीही खूप कार्य केले. भक्तिमार्गावर त्यांचा विश्वास होता. वीरशैवाने मांसमदिरा भक्षण करू नये अशी त्यांची शिकवण होती. सामान्य जनतेलाही आपली मते समजावीत म्हणून त्यांनी व त्यांच्या काही भक्तांनी सोप्या कानडी भाषेत पदे रचली. बेळगावच्या कॉंग्रेसच्या सभेत बोलताना एकदा महात्मा गांधींनी म्हटले होते की आपण भारतात जे कार्य करायचा प्रयत्न करीत आहोत ते बसवेश्वरांनी कर्नाटकात अगोदरच बाराव्या शतकात करून ठेवले आहे.



# चक्रधर

चक्रधरांचे मूळ नाव हरपाळ देव. गुजरातेतील भडोच शहरी ह्यांचे घराणे प्रसिद्ध होते. पिता संस्थानिक होता आणि घरात वैभव पाणी भरत होते. पत्नी अत्यंत सौन्दर्यवती होती. एकदा देवगिरीच्या राजाने गुजरात-वर स्वारी केली. हरपाळ देव त्यावेळी ऐन पंचविशीत होते. अंगात रग



होती. अंतःकरणात स्वाभिमान होता. तेव्हा देवगिरीच्या राजाला निकराचा लढा देण्याची हरपाळ देवाने तयारी केली. आणि त्यात ते यशस्वी झाले. शत्रूच्या सैन्याचा सागर मागे रेटीत रेटीत त्यांनी वेरूळपर्यंत पोहोचवला पण विजयाच्या शेवटी अरिष्ट आले. हरपाळ देव आजारी पडले आणि



दैवी अथवा मानवी कुठलेही उपचार सफळ न होता त्यांना मृत्यू आला.

ह्यापुढील हकीगत मोठी अद्भुत आहे. अंत्य संस्काराला हरपाळ देवचे प्रेत नेत असता, ते जागे झाल्याप्रमाणे उठून बसले. लोकांना विस्मय वाटला. ही पिशाच्च बाधा तर नाही ना ? सर्व लोक चकित झाले, तितकेच घाबरलेही. प्रेताचा जिवंत माणूस झालेल्या माणसाची परीक्षा पाहाण्यात आली. तो साऱ्या खुणा बरोबर सांगे. अगदी खास पत्नीलाच ठाऊक होत्या अशाही गोष्टी त्याने बरोबर सांगितल्या. हरपाळ देव हे पुन्हा जिवंत झाले म्हणून सर्वांना आनंद झाला. पित्याच्या आनंदाला तर पारावारच राहिला नाही. हरपाळ देव पूर्वीप्रमाणेच सुखात आपले आयुष्य काढू लागले.

हरपाळ देव म्हणजेच चक्रधर. जेव्हा ऐन तारुण्यात ते प्रेत होऊन पडले, तेव्हा चांगदेव राऊळाने त्यांच्यात प्रवेश केला अशी श्रद्धा महानुभाव पंथात आहे. पुढे गुरुप्रसाद झाल्यानंतर त्यांचा नामकरण विधीही झाला. गुजरातचे हरपाळ देव महाराष्ट्रात चक्रधर म्हणून प्रसिद्ध पावले. आणि त्यांनी महानुभाव पंथ चालवला. त्यांची जन्मभूमी गुजरात असली तरी कर्मभूमी महाराष्ट्र ठरली.

चक्रधरांचे पहिले आयुष्य विशेष चमत्कारांनी भरलेले नाही. भडोच येथील राजाच्या कुलात जन्मलेला हा राजपुत्र मोठा चैनी होता. यथाकाल त्यांचे लग्न झाले आणि अत्यंत देखण्या पत्नीची जोड मिळाली. संसाराच्या विलासात चक्रधर रंगून गेले. त्यांना जुगाराचा विलक्षण नाद लागला. केव्हा तरी आपण डाव जिंकून खूप पैसा मिळवू आणि गेल्याची भरपाई करू अशी वेडी आशा जुगाऱ्याला नेहमी असते. चक्रधरांचे असेच झाले. त्यांनी आपल्या जवळचे होते नव्हते ते सारे गमावले आणि मौज ही की, घरात ह्याचा अजिबात पत्ता लागू दिला नाही. एक दिवस मात्र अशी तोहमत आली की, आता गोष्टी बाहेर फोडल्याशिवाय गत्यंतरच नव्हते. चक्रधर अत्यंत लाचार होऊन घरी आले आणि आपल्या बायकोकडे दागिने मागू लागले. तिला सर्वच नवीन होते. ती चकित झाली. त्यांना

खूप बोलली. मात्र दागिने देण्याचे तिने साफ नाकारले. ' हे माझ्या माहेरचे आहेत आणि माझे स्त्रीधन आहे. ते मी तुमच्या हवाली करणार नाही. ' असे तिने निक्षून सांगितले. चक्रधराचे डोळे साफ उघडले. अखेर संकटाचे काळी कुणी नाही, आपला उद्धार आपणच करून घ्यायचा असतो हे त्यांना कळून चुकले.

अखेर चक्रधरांनी आपला राजवाडा व संसार सोडून दिला आणि तीर्थयात्रेच्या निमित्ताने ते बाहेर पडले. चक्रधर फिरत फिरत वऱ्हाडात आले आणि तेथच त्यांना श्री गोविंदप्रभू हे गुरू भेटले आणि त्यांनी त्यांच्यावर अनुग्रह केला.

गुरुप्रसाद मिळाल्यानंतर तपस्येसाठी चक्रधर अरण्यात निघून गेले. कुणी म्हणतात, त्यांनी सालबर्डीच्या जंगलात तपस्या केली. हा काळ बारा वर्षांचा होता. ह्या काळात त्यांची दिनचर्या काय होती, ते उपासना कशी करीत, त्यांचा आहार काय होता, त्यांचे मित्र कोण होते ह्याबद्दल काहीच माहिती उपलब्ध नाही. बारा वर्षानंतर ते कांती शहरात प्रगट झाले, एवढेच आपणाला ठाऊक आहे. चक्रधर हे जरी देवाचा अंश असले आणि गुरुकृपा जरी त्यांना लाभली असली तरी त्यांना साधना करावीच लागली. पूर्ण पुरुष म्हणजे देव. ती पूर्णता येण्यासाठी कुठल्याही माणसाला तपश्चर्येची आवश्यकता असतेच. तपश्चर्येशिवाय मोठेपण नाही, हेच ह्यावरून सिद्ध होत नाही काय ?

तपश्चर्या पुरी करून आल्यावर उधळीनाथ नावाचे एक सत्पुरुष चक्रधरांना भेटले. चक्रधरांना आपली विद्या शिकवावी असे त्या सिद्ध पुरुषाला फार वाटले. पण चक्रधर हे अगोदरच इतके विद्यासंपन्न होते की उधळीनाथांजवळ त्यांना देण्यासारखे काहीही उरलेले नव्हते. पण चक्रधरांचे रूप इतके ओजस्वी होते की उधळीनाथांना त्यांचे फार कौतुक वाटले. आणि त्यांनी चक्रधरांना ' वयस्तंभिनी " विद्या दिली. ह्या विद्येमुळे माणसाचे वय वाढत नाही. त्याला म्हातारपण येत नाही. चक्रधर ह्यावेळी तिशीत होते. ते अखेरपर्यंत तरुण राहिले.

चक्रधर हे ज्ञानेश्वरांच्या अगोदर थोडे दिवस होऊन गेले. म्हणजे चक्रधर समाधिस्थ झाले, त्यानंतर एकाच वर्षाने ज्ञानेश्वरांचा जन्म झाला. चक्रधर गुजरातेतून महाराष्ट्रात आले. वऱ्हाडात त्यांनी गुरुपदेश घेतला. पण नाशिक ते पैठण या प्रदेशात त्यांनी जीवनभर संचार केला. ज्ञानेश्वरांची कर्मभूमी हीच.

परमेश्वराची प्राप्ती करून घ्यायची असेल तर सर्वस्व सोडले पाहिजे. संन्यस्त वृत्तीने राहिले पाहिजे असा चक्रधरांचा उपदेश होता. गुरूच्या कृपेला या पंथात फार महत्त्व आहे. शिष्याने भिक्षा मागून आणली तर ती गुरूला दाखविली पाहिजे असा निर्बंध या पंथात आहे. भिक्षा निरनिराळ्या घरची असते. त्यात कुणी सुष्ट असतात कुणी दुष्ट असतात. गुरूने आपली पवित्र नजर भिक्षेवर टाकली म्हणजे ती शुद्ध होते अशी या पंथाची श्रद्धा आहे. स्त्री आणि पुरुष, उच्च जाती आणि नीच जाती असा या पंथात भेद नाही. ऐषाराम किंवा चैन यांचा चक्रधरांनी निषेध केला आहे. अहिंसेची पताका चक्रधरांनी फार उंच फडकत ठेविली.

त्याकाळी धर्म आणि तत्त्वज्ञान यांची मिरास ब्राह्मणादी उच्च वर्णीयांकडे होती. बहुजन समाज संस्कृत विद्येला पारखा झाला होता. अहंमन्य उच्चवर्णीय समाज संस्काराचे जे चार शिळे तुकडे फेकील त्यावर बहुजनांनी निर्वाह करायचा. चक्रधरांनी याच्याविरुद्ध बंड पुकारले. त्यांनी आपला उपदेश सर्वांना सुलभ व्हावा म्हणून मुद्दाम मराठी भाषेत केला. मराठी भाषेत ग्रंथरचनेचा पाया घालणारे ते एक लोकोत्तर पुरुष होत. त्यांनी मोक्षाचे द्वार सर्वांना सुलभ केले. मराठी भाषेला नवी प्रतिष्ठा दिली. त्यामुळेच उच्च वर्णीयांनी जरी त्यांचा प्राणांतिक छळ केला तरी हजारो बहुजन त्यांच्या पंथात सामील झाले.

ह्यानंतर चक्रधरस्वामी धर्मोपदेश करून लोकांचा उद्धार करीत हिंडू लागले. हळूहळू त्यांच्या भोवती निष्ठावंत अनुयायी जमू लागले आणि महानुभाव पंथ वाढत गेला.

चक्रधर स्वामींची लोकप्रियता वाढू लागली तसतसे त्यांना शत्रूही उत्पन्न झाले. स्वामी स्वतः अहिंसक. शरीराने तर राहूच द्या पण मनाने-सुद्धा हिंसा करायची नाही असा चक्रधरांचा निश्चय असे. आपल्या शत्रूंचा प्रतिकार त्यांनी कधीच केला नाही. एकदा त्यांना सुपारीतून विष देण्यात आले. अनंत यातना त्यांनी सहन केल्या पण विष देणाऱ्यांचे अहित चिंतिले नाही.

जुन्या पद्धतीच्या अनेक गोष्टींना स्वामींचा विरोध होता. यज्ञादी त्यातच येत. जातिभेदाच्या तर स्वामी पूर्ण विरुद्ध होते. माणसाने मुक्ती-साठी तीर्थयात्रा केलीच पाहिजे, हे मत त्यांना मान्य नव्हते. याचा अर्थ तीर्थादिकांच्या ठायी पुण्यमय वातावरण नसते असे त्यांना म्हणावयाचे नव्हते. पण तीर्थयात्रेशिवाय मोक्षच नाही ही दिशाभूल आहे असे त्यांना वाटे.

काकोस नावाचा त्यांचा एक शिष्य होता. काही माणसे द्वारकेला जायला निघाली तेव्हा यालाही त्या मेळचात सामील होऊन द्वारकायात्रा करावी असे वाटले. चक्रधर स्वामींनी त्याची खूप समजूत घातली. आपला देह हेच देवाचे राऊळ आहे. देवासाठी दुसरीकडे जाण्याची गरज काय आहे ? पण काकोसाला एवढा विवेक कुठला ? त्याने ध्यासच घेतला. मग चक्रधर स्वामींनी त्याला धडा शिकविला. तो स्वस्थ डोळे मिटून बसला असता समोर द्वारकानगरी दिसू लागली. राजदूत आपल्याला मोठ्या राजवाड्यात नेत आहेत असे त्याला दिसले. आत जातो तो प्रत्यक्ष श्रीकृष्ण भगवान उभे. त्याचा आनंद गगनात मावेना. हळूहळू श्रीकृष्णाची मूर्ती लुप्त होऊन त्याजागी शिष्याला चक्रधर स्वामी दिसू लागले. मग त्याला पटले की परमेश्वर जवळच आहे. गुरुमूर्ती हीच परमेश्वरमूर्ती. उगाच तीर्थयात्रा करून देहाला पीडा व क्लेश द्यायचे काही कारण नाही.

खरा धर्म म्हणजे काय, हे चक्रधर स्वामी अशा तऱ्हेने प्रतिपादन करीत होते. नुसते उपचार विधी, व्रतवैकल्ये म्हणजे धर्म नव्हे हे त्यांनी उपदेशाने, आचरणाने आणि दृष्टांतांनी पटवून दिले. पण याच योगे

त्यांच्या सनातनी शत्रूंची माथी भडकली. सर्वांनी राजाचे कान भरले. आणि चक्रधर स्वामींच्या छळात राजसत्ता सामील झाली.

मुधादित्याचे देवळात सारे ब्राह्मण पंडित जमले. त्यांनी चक्रधर स्वामींना पुढे बोलावून त्यांची चौकशी केली. चौकशी कसली ? चौकशीचा फार्सच होता तो ! चौकशी करणाऱ्या ब्राह्मण पंडितात कित्येक पापी व लफंगे होते. अशांनी एका निर्मल साधूचा न्यायनिवाडा करावयाचा ? चौकशीचे नाटक करून चक्रधर स्वामींचे नाक-कान कापण्याची शिक्षा विप्रवर्यांनी फर्मावली. आणि लगेच ती अंमलातही आणली.

चक्रधर स्वामींनी तीन दिवस आपणाला एकांतात कोंडून घेतले. आणि चौथे दिवशी ते बाहेर आले. तो काय ? त्यांचा चेहरा पूर्ववत देखणा झालेला. शिष्य हर्षभरित झाले. हजारो मनुष्यांचा आनंद गगनात मावेना.



आपण ज्याचे नाक-कान छाटले तो बंडखोर माणूस पुन्हा शाबूद आणि तेजःपुंज झाला हे वर्तमान कळताच कर्मठांच्या अंगाची लाही लाही झाली. आता राजदंडाच्या आधारेच या महापुरुषाचा निकाल लावला पाहिजे असे ब्राह्मण पंडितांनी ठरविले.

चक्रधर स्वामींना त्याच्या मठातून बाहेर काढण्यात आले. शिष्य नागदेव मध्ये पडला. त्याच्या पाठीत शिपायांनी दांडकी मारली आणि त्याला दूर पिटाळून लावले. क्षणाचाही वेळ न लावता महान दयामूर्ती चक्रधर स्वामी यांचा शिरच्छेद करण्यात आला. नदीकाठ होता. कुणी बैरागी स्वामींच्या छिन्नविच्छिन्न देहाकडे पहात होता. तो काय चमत्कार? शिर हलू लागले. ते धडाला चिकटले. हातपायांना चलनवलन आले. चक्रधर जिवंत झाले. एकेक पाऊल टाकीत नगाधिराज हिमालयात ते निघून



गेले. जनाच्या दु:खाकडे करुणेने पहात आणि पापताप नाहीसे करीत ते तेथे अजून आहेत असे म्हणतात.

'तेराव्या शतकातले गांधीजी' असे चक्रधरांचे वर्णन करता येईल. ते गुजरातेत जन्मले. वस्तीला महाराष्ट्रात आले. त्यांनी अहिंसेचा प्रचार केला. अखेर गांधीजींप्रमाणेच त्यांचा वध झाला. आणि तोही चक्रधरांची सामाजिक मते क्रांतिकारक होती त्यामुळे चिडून गेलेल्या सनातनी समाजाकडून. दुसऱ्या पंथाचा किंवा दुसऱ्याच्या श्रद्धेचा उपहास करू नये असा त्यांचा स्पष्ट आदेश असे. त्यांनी आपला पंथ सर्वांसाठी खुला ठेवला.

# एकनाथ

" श्री. एकनाथ सदनी माधवजी सर्व कामही करितो
स्वकरे चंदन घासी, गंगेचे पाणी कावडी भरतो ॥ "

ही आर्या प्रख्यातच आहे.

प्रत्यक्ष परमेश्वराला ज्यांच्या घरी राबण्यात आनंद वाटला असे हे महान भगवद्भक्त एकनाथ, पैठणला 1528 च्या सुमारास जन्मास आले. हे संत भानुदासांचे नातू. संत भानुदास ह्यांची महाराष्ट्राच्या धार्मिक इतिहासात एक महत्त्वाची कामगिरी आहे. ती म्हणजे कर्नाटकात गेलेली विठ्ठलमूर्ती संत भानुदासांनी आपल्या तपश्चर्येच्या जोरावर परत पंढरपूरला आणली. भानुदासांच्या कुलात हा एकच सुपुत्र राहिला म्हणून वडिलांनी मोठ्या कौतुकाने त्याचे नाव " एक्या " असे ठेवले.

लहानपणापासून नाथांची बुद्धी फार तल्लख होती. नित्यकर्म, संस्कृत स्तोत्रे वगैरे त्यांनी लौकरच पाठ केली. सहाव्या वर्षी त्यांचे मौंजीबंधन झाले. नाथ हे ह्याही वयात काही अलौकिकपण दाखवीत. त्यांना हरि-भक्तीचा जन्मापासूनच छंद होता. लहानग्या एकनाथाने गोटे मांडावेत आणि देव म्हणून त्यांना फुले वहावीत. कधी संध्येची पळी खांद्यावर घेऊन तिला ब्रह्मवीणा म्हणावे आणि बोबड्या शब्दांत भक्तीपदे म्हणावीत असे चाले. एखादे कीर्तन पाहून आल्यावर लहानगा एकनाथ त्याची हुबेहूब नक्कल करी. एखादी काठी हाती घ्यायची, त्याला एखादी चिंधोटी बांधायची आणि ती पताका खांद्यावर घेऊन मी पंढरीला चाललो आहे असे म्हणावयाचे, हे नाथांचे खेळ असत. तेव्हा अशा सत्त्वगुणी मुलाला एखाद्या उत्तम गुरूकडे विद्याभ्यासासाठी ठेवावे असे एकनाथांच्या वडिलांनी ठरविले. आणि असे गुरू पूर्वपुण्याईने त्यांना लाभले.

हे गुरू म्हणजे जनार्दन स्वामी. आपल्या अभंगांतून एकनाथांनी आपल्या नावाबरोबरच गुरूच्या नावाचाही मोठ्या भक्तीने उल्लेख केला आहे.

" एका जनार्दनी. "



जनार्दन स्वामी मोठे राजकारणी होते. हे मूळचे चाळीसगावचे देशपांडे. पुढे दौलताबादेस यवनराजाचे मुख्याधिकारी झाले. ते संसार आणि कामधंदा चोख करीत. परंतु त्यांचे लक्ष परमार्थाकडे असे. त्यांच्या समाधीची जागा ठरलेली असे. आणि ते तिकडे कुणाला फिरकू देत नसत. एकनाथ त्यांच्याकडे गेल्यावर जनार्दन स्वामींनी तात्काळ ताडले की, ही व्यक्ती सामान्य नाही आणि त्यांनी त्यांना गुरूपदेश दिला. सर्व विद्या शिकविल्या. एकनाथांनी आपल्या गुरूची अनन्य सेवा केली.

एके दिवशी गुरूंनी रात्री पाहिले तो एकनाथ सचिंत होऊन काहीतरी शोधीत आहेत असे दिसले. त्यांच्यापुढे जमाखर्चाच्या वह्या पडल्या होत्या. त्यांचा चेहरा त्रस्त दिसत होता. इतक्यात एखादी गोष्ट अचानक सापडावी असा एकनाथांचा चेहरा झाला. टाळी वाजवून ते मोठमोठ्याने हसू लागले. जनार्दन स्वामी



आत आले आणि त्यांनी विचारले. "अरे एक्या, एवढा कसला आनंद झाला आहे तुला?" "महाराज, आजच्या हिशेबात एक पैची चूक होती, ती काही केल्या सापडेना. पुन्हा पुन्हा बेरीज वजाबाकी करून डोकं भणाणून गेलं. शेवटी ती चूक सापडली, त्यामुळे मी आनंदाने टाळी वाजविली." तेव्हा जनार्दन स्वामी हसून म्हणाले, "अरे, एवढे लक्ष तू जर परमेश्वरावर स्थिर करशील तर तुला जो ब्रह्मानंद होईल तो ह्या क्षुद्र आनंदापुढे काहीच नाही."

जनार्दन स्वामींनी एकनाथ हे पूर्णतेला पोहोचल्यानंतर त्यांना श्रीदत्तप्रभूंचे साक्षात दर्शन घडविले. त्याचप्रमाणे सुलभ नावाच्या पर्वतावर सूर्यकुंड ह्या नावाचे एक तीर्थ होते, त्या ठिकाणी जाऊन तपश्चर्या करण्याचा आदेश दिला. तपश्चर्या पूर्ण झाल्यावर गुरूंनी त्यांना तीर्थाटनाला चलण्याची आज्ञा केली. तीर्थाटन हे तपश्चर्येचेच एक अंग समजले जात असे.

जनार्दन स्वामी एकनाथांच्या बरोबर नाशिक-त्र्यंबकेश्वरपर्यंत आले. आणि नंतर त्यांनी "तुझा प्रवास सुखकर होवो," असा शिष्याला निरोप दिला. पुढे एकनाथ भारतातील सर्व प्रमुख क्षेत्रे पाहात पाहात, देवदर्शने घेत घेत स्वग्रामी परत आले.

मनुष्य देवधर्माकडे वळला किंवा लोकसेवेत रंगला म्हणजे तो संसाराची किंवा व्यवहाराची आबाळ करतो असा साधारण समज आहे. पण एकनाथांनी आपल्या वागणुकीने तो खोटा ठरविला. संसार आणि परमार्थ ह्यांची त्यांनी उत्तम सांगड घातली. कुटुंब उत्तम तऱ्हेने चालविले. लोकांना धर्मनीतीची दीक्षा दिली. उत्कृष्ट ग्रंथरचना केली आणि जगाचे भले म्हणवून घेतले.

एकनाथ हे शांतिब्रह्म होते.



त्यांनी क्रोधाला संपूर्णपणे जिंकले होते. ते गंगेवर स्नानाला जात असता, एक माणूस त्यांच्या अंगावर थुंकला. ते काही न बोलता गंगेवर स्नान करून आले. पुन्हा त्या क्षुद्र माणसाने तोच प्रकार केला. असे एकशे आठ वेळा झाले. पण एकनाथ रागावले नाहीत. शेवटी तो माणूस शरमिंदा झाला. त्यांच्या पाया पडून त्यांची क्षमा मागू लागला. तेव्हा एकनाथ म्हणाले, " अरे, तू वाईट वाटून घेऊ नकोस. तुझ्यामुळे मला एकशे आठ वेळा गंगा-स्नान घडले. तेव्हा मीच तुझे आभार मानले पाहिजेत. "

एकनाथ हे सर्वाभूती परमेश्वर पाहाणारे होते. जातपात पाहाण्याचा संकुचितपणा त्यांच्या ठायी नव्हता. एकदा नदीच्या वाळवंटात, महाराचे एक पोर रडत असलेले त्यांनी पाहिले. ते स्नान करून सोवळ्याने घरी चालले होते. पोराकडे पाहून त्यांचे मन द्रवले आणि त्यांनी त्या पोराला उचलून त्याच्या आईवडिलांच्या हवाली केले.

गावात राणू नावाचा एक महार राहात असे. तो अतिशय नम्र आणि सदाचरणी होता. त्याच्या तोंडून कधीही अपशब्द बाहेर पडत नसे. मेलेल्या जनावराचे मांस त्याने कधी खाल्ले नाही. त्याला लोक काहीशा कौतुकाने आणि विनोदाने " राणू भटजी " म्हणत. नाथांनी आपल्या घरी येऊन भोजन करावे अशी त्याची इच्छा होती. त्याने ती इच्छा नाथांजवळ बोलून दाखविली आणि नाथ आनंदाने ह्या गोष्टीला तयार झाले. तो काळ लक्षात घेता, नाथांचे हे करणे किती विलक्षण धैर्याचे होते हे लक्षात येईल.

महारवाड्यात आनंदीआनंद पसरला आपापल्या मगदूराप्रमाणे अस्पृश्य बांधवांनी आपली घरे सजविली. राणूकडे तर काय दिवाळीचा सणच असल्यासारखे उत्सवाचे स्वरूप आले. राणूकडे जेवायला नाथ निघाले तेव्हा दुतर्फा उभ्या असलेल्या अस्पृश्यांनी जयजयकार केला. राणूकडले साधे जेवण नाथांना अमृतासारखे वाटले. राणूला आणि त्याच्या बांधवांना तर प्रत्यक्ष परमेश्वरच आपल्या घरी जेवायला आला आहे असा भास झाला. काही काळ अस्पृश्यांच्या त्या उपेक्षित वस्तीत स्वर्गच उतरला आहे असे दृश्य दिसले.

पण नाथांचे हे औदार्य रूढीच्या दासांना कसे सहन व्हावे ? पैठणचा सारा ब्रह्मवृंद खवळला. एकनाथासारखा ब्राह्मण महारवाड्यात जाऊन खुशाल जेवण करतो म्हणजे केवढा भ्रष्टाचार, असे त्यांना वाटले सर्वांनी

एकनाथांना वाळीत टाकले. पुढे नाथांच्या घरी श्राद्ध होते. ब्राह्मण जेवायला आले नाहीत. पण प्रत्यक्ष पितरच येऊन पाटावर बसले.

एकदा नाथांच्या घरात चोर शिरले. नाथ सधन आणि सुखवस्तू आहेत ही ख्याती होती. तेव्हा ह्या ठिकाणी मोठे घबाड मिळणार अशा आनंदात चोर होते. चोरांनी घरातील दागिने जमा केले. एवढ्यात नाथ आणि त्यांची पत्नी दोघे जागी झाली. नाथांनी चोरांना अडथळा केला नाहीच. उलट आपल्या हातातील अंगठी त्यांनी जमा केलेल्या वस्तूत टाकली.





चोर वरमले. त्यांनी नाथांचे पाय धरले. आणि चोरीचा धंदा सोडण्याची शपथ घेतली. नाथांच्या आज्ञेवरून, साध्वी गिरजाबाईने तेवढ्या रात्री स्वयंपाक करून चोरांना पोटभर जेवू घातले.

एकदा पैठणात एका वृद्ध स्त्रीला सहस्रभोजन घालण्याची इच्छा झाली. बाई अत्यंत गरीब होती. तिला स्वतःच भिक्षेवर निर्वाह करावा लागे. सहस्रभोजनाचा संकल्प ती कसा पार पाडणार? इतक्यात एक भला ब्राह्मण तिला

भेटला. तो म्हणाला, " तुला एका ब्रह्मनिष्ठ सत्पुरुषाला जेवायला घालता आले तर पहा. त्यायोगे तुला सहस्रभोजन घातल्याचे पुण्य लाभेल. असा ब्रह्मनिष्ठ तपोनिधी सुदैवाने आपल्या गावात आहे. एकनाथ महाराजांना तू जेवायला बोलव." तिला आनंद झाला तिने एकनाथांना आमंत्रण दिले. स्वयंपाकाची सर्व सिद्धता केली. एकनाथ जेवायला गेले. नाथांचा मुलगा हरिपंडित मोठा कर्मठ होता. त्याला हे आवडले नाही. तो बापाच्या मागोमाग तेथे गेला. एकनाथांनी शांतपणे तेथे भोजन केले आणि हरि-पंडिताला पत्रावळ उचलून टाकण्यास सांगितले. हरिपंडिताने एक पत्रावळ उचलली तो दुसरी त्याखाली तयार. ती उचलली, पुन्हा तिसरी तशीच खाली दिसली. अशा रीतीने हजार पत्रावळी एकाखाली एक निघाल्या. म्हातारीला स्वर्ग ठेंगणा झाला. हरिपंडित पश्चाताप पावून वडिलांच्या पाया पडला आणि म्हणाला, "आपण साक्षात ब्रह्ममूर्ती आहात. मी कर्मठपणाच्या आहारी जाऊन आपला उगीच राग केला. आपल्या पोटी जन्म घेतला हे माझे महत् भाग्य आहे." मुलाचा कर्मठपणा लुप्त झाला. तो मानव धर्माचा पुजारी झाला. हे पाहून एकनाथांना फार आनंद झाला.

ह्याच हरिपंताने काशी यात्रा करून गंगेची कावड आणली होती. आणि ती घेऊन तो रामेश्वरला जाणार होता. वाटेत आपल्या गावी म्हणजे पैठणला तो थांबला. गंगेची कावड रामेश्वरला अभिषेक करायला घेऊन जाणे हे त्याकाळी मोठे पुण्य-कृत्य समजले जात असे. हरिपंडि-ताच्या स्वागतासाठी आणि गौरवा-साठी समस्त गावकरी मंडळी सामोरी गेली. नाथही त्यात होते. उन्हाची वेळ होती. हरिपंडिताने कावड ठेवली त्याच्याजवळच एक गाढव





तहानेने तडफडत पडले होते. नाथांना त्या गाढवाचा कळवळा आला. हरिपंडिताने खांद्यावरून खाली ठेवलेल्या कावडीतील पाणी त्यांनी त्या गाढवाला पाजले. हरिपंडित संतप्त झाला. वडिलांच्यापुढे त्याला काही बोलता येणे शक्य नव्हते. पण मनात तो जळफळत होता. वडिलांनी पवित्र गंगोदक गाढवाला पाजून भ्रष्टाचार केला असे त्याला वाटले. एवढे श्रम करून आणि अडचणींना तोंड देऊन गंगेची कावड आणली आणि आपल्या पित्याने ती एका क्षुद्र आणि निषिद्ध प्राण्याची तहान भागविण्यासाठी वापरली ह्याला काय म्हणावे ? हरिपंताला त्या दिवशी झोप लागली

नाही. पहाटे किंचित डोळा लागला तेव्हा रामेश्वराने स्वप्नात येऊन त्याला दृष्टांत दिला, 'तू शंभर कावडींचा जरी मला अभिषेक केला असतास तरी जे पुण्य लाभले नसते ते एकनाथांनी एक कावड गाढवाला पाजल्यामुळे तुला लाभले. सर्वभूती परमेश्वर पाहाण्याची ही दृष्टी एकनाथांच्या ठायी होती. ते माणसामाणसांत तर भेद करीत नसतच, पण माणूस आणि मनुष्येतर प्राणी ह्यांकडेही सारख्याच ममतेने पाहात.

नाथांनी ज्ञानेश्वर महाराजांच्या अलौकिक ग्रंथाचे (ज्ञानेश्वरीचे) संशोधन करून तो ग्रंथ सर्वांना सुलभ केला.

एकनाथ जेवढे थोर संत होते तेवढेच श्रेष्ठ साहित्यिकही होते. मराठीमध्ये संस्कृतातील तत्त्वज्ञान आणि नीती आणून प्राकृत माणसाला ती सुलभ करून दिली हे एकनाथांचे फार मोठे कार्य आहे. धर्मसुधारणेच्या कामी जसे एकनाथांनी धैर्य दाखवले तसेच मराठीत ग्रंथरचना करण्याचे कामीही दाखवले. 'भावार्थ रामायण' आणि 'रूक्मिणी स्वयंवर' हे नाथांचे दोन ग्रंथ विशेष प्रसिद्ध आहेत. श्रीराम आणि श्रीकृष्ण ही दोन भारताची मुख्य दैवते. भारतात जे जे काही उच्च आहे, ते ते ह्या दोन विभूतींच्या चरित्रात आढळते. वाल्मिकी रामायणावरून मराठीत रामकथा सांगण्याचा पहिला प्रयत्न नाथांनी केला. अपूर्व वर्णनशक्ती आणि रसाळपणा ह्यांमुळे हे रामचरित्र फार सरस वठले आहे. रूक्मिणी स्वयंवरात श्रीकृष्णभक्तीची परमावधी गाठली आहे.

नाथांचे अभंग हा भक्तिवाङ्मयातील एक मौल्यवान खजिना आहे. अभंगासारखे काव्य सतत ओठांवर राहिल्याने बहुजनांपुढे नीतीचे आदर्श सतत जिवंत राहातात. नाथांचे आणखी एक वैशिष्टच म्हणजे त्यांची भक्तीपर पदे आणि गौळणी. हे मोठे मधुर असे भक्तिवाङ्मय आहे.

नाथांच्या वाङमयातील एक वैशिष्टचपूर्ण दालन म्हणजे भारूड. हा शब्द बहुरूढ (म्हणजे खूप परिचित असलेले) ह्या शब्दावरून निघाला आहे.

एकनाथांनी भक्तिप्रेमाचा आनंद भरपूर लुटायची सोय करून दिली. माणसाने नम्र व भक्तिमान असावे. संसार नीट करावा पण त्यात गुंतून पडू नये. लोकसेवा हीच ईश्वरसेवा मानावी. असा साधा उपदेश एकनाथांनी केला. अरण्यात जाऊन भगवंताचे नाव घेत बसावे असा संदेश त्यांनी दिला.

नाही. सर्व प्राणिमात्र हाच परमेश्वर ही शिकवण त्यांनी दिली.

समाजात देव बघावा अशी वृत्ती अंगी बाणली म्हणजे मग भेदाभेद कुठला ? ब्राह्मण आणि अस्पृश्य दोन्ही जर देवाचेच अंश तर मग एक उच्च आणि दुसरा नीच कसा ठरेल ? आपल्या शरीरातसुद्धा देव आहे. नाथांनी एका अभंगात देह हे देवाचे देऊळ असे फार उत्कृष्ट वर्णन केले आहे.

नाथांची जीवनयात्रा संपत आली होती. भावार्थ रामायणाची 44 प्रकरणे पुरी झाली होती. आता आपण आपला अवतार समाप्त करणार हे नाथांनी आपल्या इष्ट-मित्रांना आणि भक्तांना सांगितले. सर्वांना अत्यंत दुःख झाले. नाथांनी रामायण पुरे करून मग देहत्याग करावा अशी विनंती त्यांना सर्वजण करू लागले. नाथ म्हणाले, " आमचा गावबा रामायण पुरे करील. "

गावबा हा अर्धवट माणूस होता. गावबाला नाथांच्या घरी केवळ पुरण पोळीचेच पोषण मिळत नव्हते. दररोज स्तोत्रे, पुराण कथा, देवाचे नावही कानावर पडे. वातावरण पवित्र होते. हळूहळू गावबाची वाणी शुद्ध होत गेली. तोही स्तोत्रपाठ करू लागला. केवळ जिभेचे चोचले पुरविण्याची त्याची वृत्ती नष्ट झाली. वेगळा आणि उच्च प्रकारचा आनंद संत सहवासात त्याला मिळू लागला.

नाथांच्या कृपेने त्याची प्रतिभा प्रफुल्लित झाली. याच गावबाने नाथांच्या इच्छेप्रमाणे भावार्थ रामायण पुरे केले.

अखेर 1599 सालची माघ वद्य षष्ठी उगवली. नाथ फार आनंदात होते. शेवटचा दीस उगवला होता. गोदेच्या वाळवंटात कीर्तन सुरू झाले. कीर्तनाला रंग चढत चालला. हजारो भाविक भोवती गोळा झाले. " विठ्ठल विठ्ठल " या गजरात सारा श्रोतृवृंद देहभान हरपला होता. लोकांना अशा रीतीने कीर्तनरंगात मग्न ठेवून नाथ हळूच त्या समुदायातून बाहेर पडले. त्यांनी गोदेत प्रवेश केला आणि वैकुंठलोकी प्रयाण केले. देहरूपाने नाथ अदृश्य झाले. पण महाराष्ट्रात आणि महाराष्ट्राबाहेरही त्यांचे वाङ्मय आज जिवंत आहे, लोकप्रिय आहे, आणि लोकांना मार्गदर्शन करीत आहे.

# चंडीदास

सुमारे चारशे वर्षांपूर्वीची गोष्ट. बंगालमधील बोलपुर गावापासून काही मैलांवर नानुरा नावाचे एक गाव होते. एक ब्राह्मण कुटुंब तेथे रहायचे. गावात बाशुली देवीचे मंदिर होते. त्याचे पुजारीपण या ब्राह्मणाकडे होते. ब्राह्मणाचा थोरला मुलगा चंडीदास फारच देखणा व चपळ होता. लोक कौतुकाने त्याच्याकडे पहातच राहात. पण चंडीदासचे मात्र कशाकडेच लक्ष नसे. तो सदैव आपल्याच नादात दंग असायचा. कसला तरी विचार करीत असायचा. अभ्यासात त्याचे अजिबात लक्ष नव्हते. वडिलांना वाटे त्याने शास्त्रपुराणांचे अध्ययन करून विद्वान व्हावे. म्हणून ते सारखे त्याच्यामागे अभ्यासाचा लकडा लावीत. पण चंडीदासवर त्याचा काहीच परिमाण होत नसे. खूप प्रयत्न करूनही वडील काही चंडीदासच्या मनात अभ्यासाविषयी गोडी निर्माण करू शकले नाहीत.

अखेर एक दिवस संतापून ते बायकोला म्हणाले, "आज त्याला जेवायला वाढू नकोस. त्या ऐवजी ताटात राख घाल."

पण कितीही झाले तरी आईचे अंत:करण ते ! मुलाच्या ताटात राख कशी वाढणार ? ताटात भात वाढला आणि पतीच्या आज्ञेचेही पालन व्हावे म्हणून एका कोपऱ्यात चिमूटभर राखही ठेवून दिली.

नेहमीप्रमाणे चंडीदास जेवायला बसला. ताटात राखही वाढलेली पाहून त्याला मोठे नवल वाटले. त्याने आईला विचारले, "ही राख कशासाठी ठेवली आहे ?" आईने त्याला वडिलांच्या निष्ठुर आज्ञेविषयी सांगितले. ते ऐकून चंडीदासला खूप वाईट वाटले. त्याला अन्न गोड लागेना. तो तसाच जेवण अर्धवट टाकून उठला.

गावाबाहेरच बाशुली देवीचे मंदिर होते. जवळून अजय नदी वाहायची. दु:खीकष्टी मनाने चंडीदास तेथे जाऊन बसला. चहूकडे निस्तब्धता होती. वाऱ्याने बकुळीच्या सावल्या थरथरत होत्या. अजय नदीच्या पाण्याचा कलकल ध्वनी ऐकू येत होता. नदीदेखील आपल्यासारखीच रडतेय असा भास चंडीदासला झाला. त्याचे मन अधिकच विषण्ण झाले. जगाला आपला काहीच उपयोग नाही. आपण कशासाठी जगायचे ? त्यापेक्षा मेलेले काय वाईट, असे विचार त्याच्या मनात येऊ लागले. तो आत्महत्त्या करायला उद्युक्त झाला.

त्याचवेळी बाशुली देवी जागृत होऊन चंडीदासपाशी आली आणि त्याला म्हणाली, " चंडीदास, असा निराश होऊ नकोस. लवकरच तू महान कवी होशील, पंडित बनशील. मानव प्रेमाची दिव्य गाणी तुझ्या मुखातून स्रवतील आणि दिगंतात तुझी कीर्ती पसरेल. जा, घरी परत जा."

देवीचे वरदान मिळाले. चंडीदासचे चित्त शांत झाले. तो परत जायला निघाला. बाशुली देवीचे मंदिर थोडे गावाबाहेर होते..तिथून घरी जाण्यासाठी चंडीदासला तालवन ओलांडून जावे लागायचे. त्या तालवनात एक झोपडी होती. चंडीदास तिथून जात असता सहज झोपडीकडे त्याचे लक्ष गेले. तो थक्क होऊन पहातच राहिला. झोपडीच्या दाराशी एक अप्रतिम सुंदर मुलगी उभी होती. चंडीदासच्या मनात आले, कृष्णाची राधाच तर नाही ना इथे अवतरली ?

पण ती काही राधा नव्हती. ती होती एक सामान्य धोब्याची मुलगी. तिचे नाव होते तारा. घरी परतल्यावर चंडीदासने एक कविता लिहिली. त्याची पहिली वहिली कविता. ती त्याने तारावर लिहिली होती.

चंडीदासविषयी अनेक आख्यायिका आहेत. पण चंडीदासचे जीवन व या आख्यायिकांविषयी विद्वानांमध्ये एकमत नाही. काहीजण चंडीदासचा जन्म बांकुरा छानना येथे झाला असे मानतात. त्याच्या मृत्यूविषयीदेखील अनेक दंतकथा प्रचलित आहेत. असे म्हणतात की, गौडच्या सुलतानाने त्याला हत्तीच्या पायदळी तुडविण्याची शिक्षा दिली होती. आणि त्याला जेव्हा हत्तीच्या पायदळी देण्यात आले तेव्हादेखील त्याच्या तोंडी रामी वा ताराचेच नाव होते. तिचीच गीते तो गात होता.

तारा ही धोब्याची मुलगी होती. अस्पृश्य जातीची होती. तिचा स्पर्श वर्जित होता. तिच्या हातचे पाणी प्यायल्याने धर्म बुडायची भीती होती. पण चंडीदासच्या लेखी तिच्या जातीला वा धर्माला महत्त्व नव्हते. त्याच्या दृष्टीने तर ती शाश्वत शक्ती होती. राधा जशी कृष्णाची शक्ती होती तशीच !

महान संत श्रीचैतन्यप्रभूंनी धोबी, चांभार, पापी, चांडाळ सर्वांनाच जवळ केले होते. ब्राह्मण आणि चांडाळ दोघेही त्यांना समानच वाटत. जातिभेद त्यांना मान्य नव्हता. त्यांच्या मते प्रेम-धर्म हाच खरा धर्म होता. चंडीदासला देखील तसेच वाटायचे. त्यानेदेखील आपल्या गीतांमधून त्याच मानव जातीवरील प्रेमाचे वर्णन केले आहे. प्रेमानेच ईश्वरप्राप्ती करून घेणे शक्य आहे, प्रेमामुळेच माणूस ईश्वराच्या जवळ पोचू शकतो असा

दिव्य संदेश चंडीदासने दिला आहे. चंडीदासची ही पदे अतिशय भावमधुर व रसाळ आहेत. चैतन्यप्रभूदेखील चंडीदासची पदे ऐकून भावमुग्ध झाले होते. वडिलाच्या नंतर बागुली देवीचे पुजारीपण चंडीदासकडे आले. प्राचीन बंगालमध्ये कित्येक जागी, विशेषकरून वीरभूम जिल्हयात धर्मठाकूर व बागुली देवीची पूजा प्रचलित होती. धर्मठाकुराचीच नंतर शंकराच्या रूपात आणि बागुली देवीची विशालाक्षी देवीच्या रूपात पूजा होऊ लागली असे म्हणतात. बागुली देवीचे पुजारीपण चंडीदासकडे आले खरे, पण निव्वळ पूजाअर्चा व टिळेमाला यांत त्याचे मन रमेना. भावविभोर होऊन तो गीते लिही आणि रस्त्यावरून जातायेताना स्वतःशीच गुणगुणत राही. नानुरच्या लोकांना वाटे, चंडीदासला वेड लागलंय.

चंडीदास पहिल्यांदा दिसला त्या दिवसापासून ताराला त्याचा क्षणभर विसर पडला नव्हता. चंडीदास स्नानासाठी नदीत उतरला की तारा



कपडे धुवायचे विसरून जाई. चंडीदास देखणा होताच. तारा देहभान हरपून त्याच्याकडे पहात राही. चंडीदासच्या गाण्यांत देखील काय विलक्षण माधुर्य होते ! ती ऐकताना ताराला असे वाटे, जणू युगानुयुगे आपण ही गाणी ऐकत आलोय.

बाशुली किंवा चामुंडा ही उग्र देवी आहे. तिचेच एक नाव आहे तारा. दंतकथा आहे की ती देवीच धोबीच्या मुलीच्या रूपात चंडीदासापाशी आली होती. तिचे नाव रामी वा रामतारा असावे. लोकांत मात्र रामी हेच नाव अधिक प्रचलित आहे. रामी धोबीणीचा कपडे धुण्याचा घाट लोक अजून दाखवतात. आणि नेहमी रामी व चंडीदास यांच्या नावाचा एकत्रच उल्लेख करतात. रामीखेरीज चंडीदासाची प्रीती मिथ्या, त्याची गीते मिथ्या होती. छायेखेरीज का कधी सूर्य असतो ? पार्वतीशिवाय शिव आणि राधेखेरीज कृष्ण असणेच शक्य नाही. ते काही असो. लोकांना ठाऊक असलेली आख्यायिका हीच की, चंडीदासाच्या मुखाने गीत रचना करण्यासाठीच बाशुली देवी रामी वा तारा होऊन त्याच्यापाशी आली होती.

" भ्रमिते-भ्रमिते नानुर ग्रामेते, प्रवेश जाइया करे "

(फिरत फिरत तिने नानुर गावी प्रवेश केला)

बाशुली देवी फिरत फिरत नानुर गावी आली. रामी व चंडीदासच्या खऱ्या प्रेमात उच्चनीच भावनेला, जातिधर्माला स्थान नव्हते. चंडीदास उच्च ब्राह्मणकुळातला मुलगा. पण तो एका धोब्याच्या मुलीच्या प्रेमात पडला. तिच्या पायी सारे काही विसरला. पूजाअर्चा करायचे देखील त्याने सोडून दिले. तो फक्त कवने रचायचा आणि कीर्तने करायचा. रामीदेखील त्याच्या बरोबर गायची आणि सावलीसारखी त्याच्या बरोबर रहायची.

लवकरच गावात कुजबुज सुरू झाली. चंडीदास धोबीणीच्या प्रेमात पडला आहे हा गावाच्या टीकेचा विषय झाला. लोक छीथू करू लागले. धर्म भ्रष्ट झाल्याची ओरड ब्राह्मणांनी सुरू केली. त्या काळी देशात तंत्र-मंत्र खूप वाढलेले होते. मोठमोठाले तांत्रिक लोक क्रुद्ध झाले. त्यांनी अनेक कारस्थाने केली.

एके रात्री रामी चंडीदासला भेटणार होती. अचानक पाऊस सुरू झाला. म्हणून रामी आली नाही. चंडीदासने थोडा वेळ वाट पाहिली. पण रामी काही आली नाही. मुसळधार पाऊस कोसळत होता. अखेर आता काही रामी येत नाही असे वाटून चंडीदास रामीच्या घरी गेला. रामी त्यावेळी एका बाईशी गप्पा मारत बसली होती. गप्पांच्या नादात तिला वेळेचे भानच राहिले नव्हते. आणि त्यानंतर पाऊस सुरू झाला होता. म्हणून रामीला

काही कबूल केल्याप्रमाणे चंडीदासपाशी जाता आले नव्हते.

चंडीदास बराच वेळ अंगणातल्या एका कोपऱ्यात झाडाआड उभा राहिला. दाट अंधार! पावसाची संततधार! बाहेर कसलासा आवाज ऐकून रामीने आपल्या मैत्रिणीला बाहेर पाहण्यासाठी पाठविले. मैत्रिणीला कुठे कुणी दिसले नाही. तेव्हा मग रामी हातात दिवा घेऊन बाहेर आली. पाहिले तर, बाहेर चंडीदास पावसात भिजत, थंडीने कुडकुडत उभा आहे. रामीने त्याला दटावले,

"अशा पावसात का कुणी घराबाहेर पडत असतं?"

घरी परत येऊन चंडीदासने आपले विख्यात गीत लिहिले,

"ए घोर रजनी मेघघटा बंधु । केमने आइला बाटे
आंगिनारी कोने बंधुये तितिछे । देखिये परान घाटे."

(अरे बंधू, तू अशा मेघाच्छदित घोर रात्री कसा आलास? अंगणातल्या कोपऱ्यात बंधू भिजत आहे, ते बघून जीव गलबलतो आहे.)

गावात या अधर्म प्रकारणाची वाच्यता झाली. काटवा ते तारापीठापर्यंत रामी-चंडीदासची, त्याच्या गीतांची चर्चा होऊ लागली. गंगातटीच्या प्रदेशात त्या काळी वैष्णव धर्माचा वाढता प्रचार होता. वैष्णवांचे साहित्य फुलत होते. त्यातच चंडीदासाच्या पदाची भर पडली. चंडीदास नवनवीन भाव व्यक्त करणारी पदे रचू लागला. बाउरी, भल्ला, बागदी, काडी, डोम वगैरे सर्व जातीचे लोक रामी-चंडीदासाचे कीर्तन ऐकायला जमू लागले.

पण या सर्व कामांमुळे चंडीदासचे वडील मात्र फारच अस्वस्थ झाले. त्यांना जेवणखाण सुचेना की रात्री झोप येईना. जमीनदाराला वाटले की हे जर असेच चालू राहिले तर समाज व्यवस्था कोलमडून जाईल. ब्राह्मणादी धर्मधुरीणांनी विचार केला की रामी व चंडीदासला वेगळे केले नाही तर धर्माचा नाश होईल. चंडीदासला नकुल नावाचा एक भाऊ होता. तो नबाबाच्या दरबारात उच्च अधिकारी होता. भावाच्या या कृत्यामुळे त्याची मान लाजेने खाली झाली. समाजातल्या बड्या धेंडांनी त्याला भंडावून सोडले. तशातच एके दिवशी चंडीदासचे वडील मरण पावले. सगळेच शोकाकुल झाले. चंडीदासाला वठणीवर आणायला हीच संधी योग्य आहे असे ठरवून ब्रह्मवृंदाने निर्णय दिला, "प्रेतयात्रेला कुणीही जायचे नाही." नकुलाने त्यांचे पाय धरून त्यांची कशीबशी समजूत घातली. तेव्हा ब्राह्मण म्हणाले, "ठीक आहे. पण चंडीदासला प्रायश्चित घ्यावे लागेल. नाहीतर



आमच्यापैकी कुणीही श्राद्धाला येणार नाही. तुमच्या अन्नजलाला स्पर्शसुद्धा करणार नाही.''

चंडीदास बिचारा काय करतो? प्रसंगच मोठा कठीण होता. वडिलांचे श्राद्ध न करून कसे चालेल? पण रामी अस्पृश्य आहे याचसाठी प्रायश्चित घ्यायचे? तिला सोडायचे? चंडीदास व्याकुळ झाला. त्याने नकुलचे पाय धरून त्याला आपली बाजू पटवून द्यायचा प्रयत्न केला. पण नकुल पाय सोडवून निघून गेला.

अखेर नाइलाजाने चंडीदास प्रायश्चित घ्यायला तयार झाला. तसे केले नाही तर वडिलांच्या आत्म्याला शांती मिळणार नाही असे त्याला वाटले. पण त्याचवेळी आपण जे करणार आहोत त्यामुळे रामीवर मोठाच अन्याय होणार आहे याचीही त्याला जाणीव होती. आणि म्हणूनच त्याच्या हृदयात मोठेच वादळ थैमान घालत होते.

ब्राह्मणांनी त्याला स्नान घालून शुद्ध केले. होमासाठी अग्नी प्रज्वलित केला. त्याच वेळी रामी धावत तेथे आली. अश्रूंनी चेहेरा भिजलेला होता.

"चंडीठाकूर, तुम्ही माझ्याकरिता प्रायश्चित घेता? इतकी का मी पतित आहे? तुम्ही माझा त्याग करणार?'' तिने कातर स्वरात विचारले.

चंडीदासचे मन विचलित झाले. त्याच्या मनात आले, "आपण ज्याला धर्म म्हणतो तो खरा काय आहे? माणसाचा तिरस्कार करणं, त्याला नीच समजणं-याहून मोठा अधर्म दुसरा नाही. रामीच्या प्रेमासाठी आज आपल्याला प्रायश्चित घ्यावं लागलं तर आपलं काव्य वृथा, आपला



मानवधर्म फुका."

त्याने ब्राह्मणांना विनंती केली, " मला जाऊ द्या."

ब्राह्मणांनी त्याला अडवले. त्याचवेळी बाहेर कसलासा गोंगाट ऐकू आला. कुणीतरी येऊन बातमी दिली की तालवनातल्या रामीच्या झोपडीला आग लावून देण्यात आली आहे.

आता मात्र निर्णय घ्यायला चंडीदासला वेळ लागला नाही. रामीचा हात धरून तो तिथून बाहेर पडला. राजुरच्या गणेश कीर्तनकाराच्या घरी दोघे गेले. जात, धर्म, घर, समाज वगैरेंची सारी बंधने गळून पडली. रात्रंदिवस नुसते देवाचे ध्यान, कीर्तन. मंडळी कीर्तनासाठी जमू लागली.

चंडीदासने त्या सर्वांना सांगितले, " तुमच्यापैकी कुणीही नीच नाही.

चंडीदास स्वःत याच शिकवणुकी अनुसार वागले. आपल्या पदांमधूनही त्यांनी याच सत्याचा प्रचार केला आहे. 'सबार उपरे मानुष्य सत्य, ताहार उपरे नाई।' ( मानव सर्वांच्या वर आहे, त्याच्या वर कुणी नाही.)

सुमारे साडे पाचशे वर्षांपूर्वीची गोष्ट. काशीजवळ लहरतारा नावाचे एक गाव होते. तेथे नीरू आणि नीमा हे कोष्टी जातीतले एक जोडपे रहात असे. एकदा ते नदीकाठावरून चालले असता, नुकतेच जन्मलेले एक सुंदर अर्भक त्यांना वाळवंटात टाकलेले दिसले. हे गोजीरवाणे, गुटगुटीत बालक मुठी तोंडात घालून मजेत इकडे तिकडे पाहात होते. नीरू-नीमा हे जोडपे फार प्रेमळ होते. त्यातून नीमा तर विशेषच. या एकाकी बालकाला घरी न्यावे आणि आपल्या पुत्राप्रमाणे वाढवावे असे त्यांनी ठरविले. दोघेही जण त्या मुलाला घेऊन घरी आले. घरी पोचल्यावर नीरूने त्या मुलाचे विधिवत नामकरण करायचे ठरविले. झटपट काजीला बोलावण्यात आले. काजीने कुराण उघडून पाहिले तर मुलासाठी अकबर, कुब्रा वगैरे नावे निघाली. त्या शब्दांचा अर्थ आहे महान वा परमात्मा. काजी विचारात पडला. एका सामान्य गरीब कोष्टयाच्या मुलासाठी असले नाव ? असो. त्या मुलाचे कबीर हे नाव ठरले.

गरीब कोष्टयाचा हा दत्तक मुलगाच पुढे महान संत व समाज सुधारक म्हणून जगप्रसिद्ध झाला.

कबीर असामान्य व्यक्ती होते. त्यांचे मूळ मातापिता कोण हे कुणालाच ठाऊक नाही. पण कोष्टी दंपतीलाच आता त्यांचे मातापिता मानतात. आपण ' जुलाहा ' म्हणजे कोष्टी आहोत, आपली जात हलकी आहे याचा कबीरांनी आपल्या कवनांतून उल्लेख केला आहे.

त्यांच्या जन्माविषयी अनेक आख्यायिका आहेत. असे म्हणतात की कुणी एक ब्राह्मण रामानंद स्वामीचे दर्शन घेण्यास गेला. बरोबर त्याने आपली विधवा मुलगी घेतली होती. तिने रामानंदांना नमस्कार करताच चुकून त्यांनी "पुत्रवती भव" असा आशीर्वाद दिला. मग त्यांच्या चूक लक्षात आली. पण त्यांनी सांगितले की या मुलीच्या पोटी जे बालक जन्माला येईल ते महान संत होईल. या विधवेच्या हातावर एक फोड येऊन त्यातून बाल कबीर बाहेर पडले असेही सांगितले जाते. "करा" वरील "वीर" म्हणून "करवीर". तोच कबीर. कबीराचा जन्म दैवी घटनेतून झाला असे सिद्ध करणाऱ्या आणखीही बऱ्याच कथा प्रचलित आहेत.

कोष्टी जातीत पालन पोषण झाले तरी कबीर राम, कृष्ण, शिव सर्वांचीच भक्ती करीत असत. म्हणून हिंदू व मुसलमान दोघांचाही

त्यांच्यावर राग होता. ते हिंदू देवांची भक्ती करतात म्हणून मुसलमान त्यांच्यावर नाराज होते तर ते मूर्तिपूजा, अंधविश्वास, जातिभेद यांना विरोध करतात म्हणून हिंदू त्यांच्यावर नाराज होते. याखेरीज हिंदूंना आणखी एक आपत्ती होती. ती म्हणजे मुसलमान असूनही कबीर हिंदू वैष्णवांच्या सारखे रहायचे. लोक त्यांना मुद्दामच खोडसाळपणे प्रश्न विचारायचे की, "तुझा गुरू कोण ?" त्या काळी लोकांची अशी श्रद्धा होती की वैष्णव माणसाचा जर कुणी गुरू नसेल तर त्यास मोक्ष प्राप्ती होत नाही.

त्यावेळी काशीच्या स्वामी रामानंदांची दूरदूरवर ख्याती पसरलेली होती. त्यांच्याकडून उपदेश ग्रहण करण्यासाठी लोक अगदी लांबूनदेखील त्यांच्यापाशी येत. त्यांच्याचकडून दीक्षा घ्यायचे कबीरांनी ठरवले.

रामानंदांचा दिनक्रम आखीव असे. पहाटे चार वाजता उठून ते गंगेवर स्नानासाठी जात. तेथून अव्याहत रात्रीपर्यंत ध्यान, पूजा, ज्ञानदान, मौन यात ते दिवस घालवीत. एक दिवस नित्याप्रमाणे ते पहाटे स्नानाला



निघाले. अंधार होता. वाटेत चुकून त्यांचा पाय कुणाला तरी लागला. रामानंद 'राम' असे म्हणाले. कबीरच होते ते. रामानंदाच्या तोंडून बाहेर पडलेल्या 'राम' शब्दालाच त्यांनी गुरुमंत्र मानले आणि आपण रामानंदांकडून दीक्षा घेतल्याचे सर्वांना सांगू लागले. त्यांनी मुसलमानांसारखे रहायचे सोडून दिले. टिळेमाळा करू लागले. त्यामुळे नीरू व नीमा बेचैन झाले. इकडे हिंदूंनी देखील ओरड करायला सुरुवात केली की रामानंदांनी एका मुसलमानाला कशी काय दीक्षा दिली? गोष्टी रामानंदांच्या कानावर गेल्या तेव्हा ते म्हणाले, "मी तर कुठल्याच मुसलमानाला गुरुमंत्र दिलेला नाही." त्यांनी कबीरांना बोलावून विचारले तर त्यांनी गंगातटावरचा त्या दिवशीचा प्रसंग सांगितला. रामानंद स्वामी प्रसन्न झाले व त्यांनी कबीरांना आपले शिष्य म्हणून मान्य केले.

कबीरांची बुद्धिमत्ता आणि अंतःस्फूर्ती अलौकिक होती. त्यांच्या गुरूलाही त्यांच्यापुढे हार खावी लागे. एकदा रामानंदांच्या मठात पितरांचे श्राद्ध होते. आपण पितराचे जे आवडते ते श्राद्धाच्या दिवशी करतो.



रामानंदांच्या पितरांना गाईचे दूध आवडत असे. तेव्हा त्यांनी कबीरांना गाईचे दूध आणावयास सांगितले. कबीर भांडे घेऊन निघाले. एके ठिकाणी एक गाय रस्त्यावर मरून पडली होती. कबीरांनी तिच्यापुढे गवताच्या पेंढया टाकल्या. आणि तेथेच भांडे ठेवून उभे राहिले. बराच वेळ झाला. श्राद्धाची सर्व तयारी झाली. तरी अजून कबीर येत नाही, हे पाहून रामानंद त्यांच्या शोधार्थ निघाले. कबीर मेलेल्या गाईपाशी उभे होते. रामानंद म्हणाले, "अरे, या ठिकाणी काय करतो आहेस तू ?" तेव्हा कबीर म्हणाले, "गुरुमहाराज, गाय दूध देत नाहीच, परंतु चाराही खात नाही." रामानंद हसून म्हणाले, "अरे, ती मेलेली आहे. चारा कशी खाईल ?" कबीरांनी उत्तर दिले, "महाराज, नुकतीच मेलेली गाय जर चारा खाऊ शकत नाही तर अनेक वर्षांपूर्वी मेलेले आपले पितर दूध कसे पिऊ शकणार ?" रामानंद निरुत्तर झाले.

कबीर हे गृहस्थाश्रमी संत होते. ते धंद्याने कोष्टी होते. आपल्या धंद्यात मन लावून काम करीत. माणसाने आपले कर्तव्य हेच परमेश्वराचे पूजन समजावे. हाच खरा धर्म. माणसाच्या कर्तव्याचे पुष्प परमेश्वराला कुठल्याही सुगंधित आणि बहुमोल फुलापेक्षा अधिक आवडते. मागावर उभे आडवे धोटे मारताना कबीर इतके रंगून जात की त्यांना त्यात देवाचे संगीत ऐकू येई. त्यांच्या सुरस काव्यातही विणकरांच्या उपमा-उत्प्रेक्षा पुष्कळ आढळतात.

"हे परमेश्वरा, हे देहरुपी वस्त्र मला दिलेस ते तू आता माझ्याकडून घेऊन जा. ते मी अगदी स्वच्छ ठेवले आहे." अशा अर्थाचे त्यांचे काव्य प्रसिद्ध आहे. आपला व्यवसाय करून कबीर परोपकारात आपले जीवन घालवीत. कपडे विणायचे आणि ते बाजारात विकायला घेऊन जायचे. त्यांचे फायद्याकडे अजिबात लक्ष नसे. कबीरांच्या अंतःकरणात करूणा ओसांडून वहात असे. एकदा एक ब्राह्मण बाजारात आला आणि केविलपणाने म्हणाला, "मी गरीब आहे. माझा खिसा रिकामा आहे. शरीर झाकण्यासाठी मला कापड द्या." दयाशील कबीरांनी त्याला अर्धा तागा कापड दिले. पण पुष्कळ भिक्षेकरी हावरट असतात तसा तो ब्राह्मण होता. त्याचे अर्ध्या ताग्याने समाधान झाले नाही. त्याने आणखी कापड द्या असे विनवले. कबीरांनी जवळ होते नव्हते तेवढे कापड त्याला देऊन

टाकले. तो ब्राह्मण कबीराला दुवा देत निघून गेला.

पण आता घरी मंडळींना खायला काय घालायचे हा कबीरापुढे प्रश्न पडला ! ते बाजारातच एकीकडे जाऊन खिन्नपणे बसले. असे तीन दिवस गेले. घरची मंडळी उपाशी राहिली. कारण कबीरांचा संचय असा काहीच नव्हता. हातावरचे पोट. बाजारातून पैसे येतील तेव्हा चूल पेटायची. आई नीमा शिजविणार काय ? बिचारी उपाशीपोटी कबीराची वाट पाहात बसली. असे सांगतात, याचवेळी एक माणूस खाण्याचे पदार्थ बैलावर घालून आला आणि हे सामान तुमच्या मुलाने दिले आहे असे सांगू लागला. पण आपला मुलगा उगीच कुणाचे मिंधेपण पत्करणार नाही ही तिला खात्री होती. ती सामान घेईना. तेव्हा त्या माणसाने सांगितले की, "काशी



विश्वेश्वराच्या दर्शनाला एक राजा आला होता. त्याने संतुष्ट होऊन हे धान्यधुन्य दिले आहे." पुढे कबीर घरी आले आणि त्यांना ही हकीकत कळली. प्रत्यक्ष देवच आपल्या साह्यास आला असे त्यांना श्रद्धापूर्वक वाटू लागले. त्यांचा भक्तीभाव अधिक दृढ झाला. सद्‌गदित होऊन ते पुन्हा एकदा परमेश्वरास शरण गेले

लोई ही कबीरांची पत्नी. कुणी म्हणतात ती त्यांची शिष्या होती. नामदेवांची जशी जनी किंवा विवेकानंदांची निवेदिता त्याप्रमाणे लोई कबीरांची भक्त शिष्या होती. एका झोपडीत ती राहत असता दोन साधू आणि कबीर तेथे गेले. तिने तिघांचेही चांगले आतिथ्य केले आणि दुधाचे वाडगे भरून तिघांपुढे ठेवले. तेव्हा दोघांनी दूध प्राशन केले परंतु कबीर म्हणाले, "मी दूध घेत नाही. आताच एक तपस्वी येथे येणार आहे. तो भुकेला आहे. त्याला माझ्यापेक्षा दुधाची जरूरी अधिक आहे." थोड्या वेळात खरोखरच एक तपस्वी तेथे येऊन दाखल झाला. क्षुधेने तो पीडित असावा असे दिसले. कबीरांनी आपणापुढील दुधाचा वाडगा त्याला दिला तेव्हा त्याने तो तोंडाला लावला आणि क्षणात रिता केला. प्रसन्न होऊन कबीरांना त्याने धन्यवाद दिला. हा चमत्कार पाहून लोई चकित झाली. कबीरांची करूणा आणि दिव्य दृष्टी तिला कळून आली. ती कबीरांच्या मागे निघाली. आणि त्यांच्याबरोबर राहून व त्यांची सेवा करून तिने आपल्या जन्माचे सार्थक केले.

कबीर मोठे प्रासादिक कवी होते. "तुका म्हणे" किंवा "एका जनार्दनी" याप्रमाणे कबीरांच्या पदाचे. शेवटी "कहत कबीरा सुन भाइ साधो" असे शब्द येतात. त्यांची पदे भारतात सर्वत्र लोकप्रिय आहेत. कबीरांच्या पदांच्या चाली सोप्या, भाषा वेधक व रसाळ, आणि उपदेश हृदयाला भिडणारा असतो.

खरा धर्म कोणता हे कबीरांनी दाखविले. धर्माचे अवडंबर त्यांना खपत नसे. आपण प्रेमाने परमेश्वर जिंकला आहे आणि तोच आता आपल्या मागे लागला आहे, असे मोठे आत्मविश्वासाचे आणि प्रेमाचे उद्‌गार त्यांनी काढले आहेत.

कबीर फक्त मानवधर्म मानीत. जातिभेदाचा, टिळामाळांचा त्यांना तिटकारा होता. हिंदू आणि मुसलमान दोन्ही धर्मातल्या ठेकेदारांवर त्यांनी

हल्ला चढविला. त्यामुळे दोन्ही धर्मांतील सनातनी लोक त्यांच्यावर खवळले होते. परंतु सामान्य जनता त्यांच्यावर खूष होती. शेकडो लोक कबीरांच्या दर्शनासाठी येत.

कबीरांची वाढती कीर्ती, त्यांची परखड वाणी, त्यांचे धगधगीत वैराग्य यामुळे धर्मसत्ता आणि राजसत्ता दोन्ही त्यांच्यावर खवळल्या. ब्राह्मण आणि मुल्ला त्यांच्या विरुद्ध शासनाकडे कागाळ्या करू लागले. त्यावेळचा सुलतान शिकंदर हा धर्मवेडा होता. प्रस्थापित धर्माची, देवदारी मिरासदारी होऊन बसलेल्या पुरोहितांची अवहेलना कबीर करतो म्हणून तो चिडला. त्याला खूप चिथविण्यात आले होते. भक्त प्रल्हादाप्रमाणें



अनेक दिव्यातून कबीरांना जावे लागले. पण प्रत्येक वेळी ते प्रभुकृपेने वाचले. या छळाच्या अग्नीतून ते तावून सुलाखून निघाले. त्यांचा सर्वत्र जयजयकार होऊ लागला.

शेवटी मगहर या गावी देह ठेवण्याचे त्यांनी ठरविले. या गावी जो मरेल तो गाढव होईल असा शाप या गावाला होता. या गावावरील हा कलंक धुवून काढण्यासाठी कबीरांनी समाधीसाठी हाच गाव पसंत केला.

हा साक्षात्कारी पुरूष आता निजधामाला जाणार म्हणून शेकडो भक्त, राजे, सरदार तेथे जमा झाले. स्वर्गारोहणाचा क्षण आला. कबीरांनी एका झोपडीत प्रवेश केला आणि दार लावून घेतले. काही वेळाने एक



ज्योती झोपडीतून निघाली. कबीर परमात्म्यात विलीन झाले. आता कट-कटीचा प्रश्न निघाला. हिंदू म्हणाले, 'आम्ही कबीरांच्या देहाचे दहन करणार.' मुसलमान भक्त म्हणाले, 'आम्ही कबीरांना दफन करून पीर बनविणार.' तलवारीच्या खणखणाटापर्यंत पाळी आली. असे सांगतात यावेळी आकाशवाणी झाली, "अरे, भांडू नका. दार उघडून बघा." लोकांनी त्याप्रमाणे केले. तो काय ? एका चादरीखाली गुलाबाच्या फुलांचा ढीग. हिंदू आणि मुसलमान भक्तांनी ती समसमान वाटून घेतली. आपापल्या पद्धतीप्रमाणे कबीरांची स्मारके बांधली. ती फुले तेव्हाच सुकून गेली. पण "कहत कबीरा" या शेवटाने जी काव्यपुष्पे बहरली आहेत त्यांची टवटवी आणि सुगंध केव्हाही नष्ट होणार नाही.

Printed at Pearl Offset Press Pvt. Ltd., Kirti Nagar Indl. Area, New Delhi-110 015.

